संस्कृताभ्यासासाठी सर्वांना उपयुक्त

# काव्यप्रवाहः

विविध विषयांवरील प्रबोधक व रंजक

## संस्कृत-काव्यसंग्रह

मराठी अनुवादासह

कवि - पं. स. त्र्यं. रहातेकर

ॐ

संस्कृताभ्यासासाठी सर्वांना उपयुक्त

# ।।काव्यप्रवाहः।।

विविध विषयांवरील प्रबोधक व रंजक

## संस्कृत-काव्यसंग्रह

मराठी अनुवादासह

**कवि - पं. स. त्र्यं. रहातेकर**



# काव्यप्रवाह:

- **आवृत्ती -** द्वितीय ( २०१९ )

- **प्रकाशक -**

सदाशिव त्र्यंबक रहातेकर

डॉ. आंबेडकर पुतळ्याजवळ , कर्जत,
जि. रायगड. पिन ४१०२०१

दूरभाषांक - ०२१४८-२२३३१३

९७६५३१७३२२ / ९८६७८७०८२८

- **अक्षरजुळवणी -**

श्री. रमण गांगल, कोतवालनगर, कर्जत

- **मुद्रक -**

स्वाती मुद्रण, गोपी टॉकीजजवळ, डोंबिवली

- **वितरक -**

सौ. नम्रता मणेर, २०४, अर्चिस अपार्टमेंट्स,
पिंटो गॅसजवळ, विठ्ठलनगर, कर्जत, जि. रायगड.
दूरभाषांक - ८०८७५७८१९५

- **किंमत - ₹ १००**

## ❧ काव्यप्रवाह: – एक विलोभनीय काव्यसंग्रह ☙

संस्कृतभाषा विविध साहित्य प्रकारांनी नटलेली आहे. तिच्यात असंख्य सुभाषितांसहित विविध काव्यप्रकार यांचा फार मोठा खजिना आहे. सर्वांच्या मनात चांगल्या विचारांविषयी आदरभाव निर्माण व्हावा, विविध शास्त्रांची माहिती व्हावी, अध्ययनवादी व्हावे, अंगी नम्रपणे यावा, थोरामोठ्यांविषयी आदर वाटावा, दुष्टजनांची संगत टाळावी इत्यादी गुणांबरोबरच सद्गुण अंगी बाळगता यावेत यासाठी संस्कृत भाषेचा अभ्यास करणे ही गोष्ट अत्यावश्यक अशी आहे. ह्या विचाराची खूणगाठ मनाशी बांधून संस्कृतभाषेतील लेखनसाहित्य सर्वांप्रत जावे म्हणून संस्कृत पंडित स.त्र्यं.रहातेकर यांनी इ.स.१९९७ पासून संस्कृत भाषेतून विविध विषयांवर लेखन केले आहे असे वाटते. दि.१ मे २०१६ रोजी त्यांचा ‘‘हास्यप्रवाह:’’ नावाचा विनोदांचा संग्रह प्रसिद्ध झाला. त्यास अनेक संस्कृतप्रेमींनी उत्तम प्रतिसाद दिला. इतकेच नव्हे तर कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय: (महाराष्ट्रम्) ह्या संस्थेने ह्या पुस्तकास गौरविले आहे.

संस्कृत भाषेवर प्रभुत्व संपादन केलेल्या पंडित रहातेकरांनी वयाच्या ८४व्या वर्षीदेखील त्यांचे संस्कृत भाषेतील लेखन चालू ठेवले आहे. ह्याचे उत्तम उदाहरण म्हणजे त्यांचा ‘‘काव्यप्रवाह:’’ हा संस्कृत काव्यसंग्रह.

‘‘काव्यप्रवाह:’’ ह्या काव्यपुस्तकांतील कविता विविध विषयांवर गुंफलेल्या आहेत. आजकालच्या कवितांमध्ये काव्यवृत्तांचा वापर फारसा केला जात नाही. परंतु प्रस्तुत काव्यप्रवाहातील बहुधा सर्व कविता इंद्रवज्रा आणि उपेंद्रवज्रा या दोन वृत्तांच्या संयोगाने होणाऱ्या उपजाति ह्या वृत्तात असल्याने त्या वाचकांना आनंद देण्यात यशस्वी ठरणाऱ्या आहेत. कवींनी सर्व संस्कृत

कवितांचा मराठीत अनुवाद केला असल्याने सर्व कविता अर्थसुलभतया वाचनीय ठरणाऱ्या आहेत.

''काव्यप्रवाह:तील पहिलीच ''स्वातंत्र्यवीरगौरवम्'' ही कविता १५ कडव्यांची असून सावरकरांना आदरांजली वाहताना कवींनी सावरकरांच्या विविध कार्यांच्या महतीचे वर्णन केले आहे. एका कडव्यात कवींनी –

**देशः ससिन्धुः प्रभवेदखण्डः । प्रदर्शितान्ते महती मनीषा ।।**

**दत्ता न किं भारतरत्नसञ्ज्ञा । तस्मै नृवीराय विनायकाय ।।**

''सिंधू नदीसह पसरलेला भारत देश पुन्हा अखंड होवो'' अशी अखेरची इच्छा असलेल्या सावरकरांना ''भारतरत्न'' हा किताब का बरे देण्यात आला नाही अशी खंत व्यक्त केली.

''विस्फोटगौरवम्'' ह्या कवितेत पाकिस्तानने हिंदुस्थानाच्या नाशासाठी जे प्रयत्न केले ते अयशस्वी होवोत असा विचार कवींनी मांडला आहे. २८ कडव्यांची दीर्घकविता ''कार्गील-विजय:'' ह्या कवितेत शूर जवानांच्या कामगिरीचे यथोचित वर्णन वाचकांना मोहित करणारे आहे. भारताचे माजी पंतप्रधान अटलबिहारी वाजपेयी यांनी (दि.२०-२-१९९९) सुरु केलेल्या लाहोर-दिल्ली बससेवेचे वर्णन करुन मा.पंतप्रधानांबद्दल मन:पूर्वक आदर व्यक्त केला आहे.

ठाणे शहराचे श्रेष्ठ समाजसेवक मा.आनंदराव दिघे यांच्या समाजसेवेचे कौतुक करुन त्यांचे मोठेपण सिद्ध केले. त्यांच्याबद्दलचा आदरभाव वर्णन करण्यात कवींनी चिन्तामणीनिर्मलवंशदीप: । जीवेत् सुपुत्रः शरदः शतं च ।। (चिंतामणी व निर्मलादेवी यांचे वंशाचा दिवा असलेल्या सुपुत्रास) शंभर शरदऋतुंएवढे आयुष्य लाभो अशी सद्भावना व्यक्त केली आहे. यासाठी वाचकांना ''धर्मवीरगौरवम्'' ही कविता नक्कीच आवडेल.

हृदयरोगतज्ज्ञ डॉ.मांडकेना ‘‘हृदयराजगौरवम्’’ ह्या कवितेत स्मरणपूर्वक श्रद्धांजली वाहताना कवी –

**नीतूवर त्वां न हि विस्मरामि । आगच्छ भूमिं त्रिदिवाद् द्रुतं त्वम् ।।**
**सम्प्रार्थयेऽहं मम देवमेवम् । तस्मै प्रभो देहि पुनर्नृदेहम् ।।**

‘‘तुझे विस्मरण मला कधी होणार नाही’’ असा विश्वासक विचार मांडतात आणि ‘‘तू स्वर्गातून पृथ्वीवर लवकर ये’’ अशी विनवणी करतात. तसेच ‘‘प्रभुने तुला पुन्हा नरदेहात जन्मा द्यावा’’ अशी आशा व्यक्त करतात.

पाळणाघरातील न आवडणारे वास्तव जीवन आईला कथन करणारा लहान बाळ ‘‘दोलागृहम्’’ (पाळणाघर) कवितेत आपल्याला भेटतो. तर कर्जतमधील सुप्रसिद्ध संस्कृतभाषाप्रचारिका आणि समाजसेविका सुलभा जोगळेकर ह्या त्यांच्या वयाच्या ७२व्या वर्षी ‘‘समाजदीपिका गौरवम्’’ ह्या कवितेत आपणास दर्शन देतात. तसेच कर्जतकर रा.द.गडकरी हे आपल्या ८२व्या वर्षी ‘‘दीपस्तंभ’’ कवितेत वाचकांना भेटतात.

याशिवाय अणुतेजः, मण्डलीकगौरवम्, नेत्रदातृगौरवम्, कविकुलगुरु–कालिदासगौरवम्, चित्रकारगौरवम् अशा अनेक वाचनीय आणि मनांची पकड घेणाऱ्या कविता ह्या काव्यसंग्रहात आहेत. याशिवाय ‘लोकलयानम् (लोकलगाडी) हे बालगीत आणि काही प्रहेलिका (कोडी) यांचा समावेशही लहानवयाच्या मुलांना निश्चितपणे आवडणारा आहे. इतरही ‘देहस्य व्याख्या, विश्वदूतौ, राष्ट्रपतिमहाभागं प्रति पत्रम्’ आदी कवितांनी ह्या काव्यसंग्रहास मनोरंजकता आणली आहे.

ह्या काव्यसंग्रहातील सर्व कविता उपजाति ह्या अक्षरवृत्तात रचल्या गेल्या असल्यामुळे त्या गेय स्वरुपात असल्याने सर्व वाचकांना आबालवृद्धांना मनमुराद आनंद देण्यासाठी यशस्वी ठरल्या आहेत. हे सर्व कवितांचे खास

वैशिष्ट्य अनुभवण्यासारखे आहे.

सर्व भाषांची जी जननी संस्कृतभाषा, त्याच भाषेतील सर्व कवितांचा हा एक अनमोल ठेवा वाटतो. त्यामुळेच ह्या पुस्तकाचे कवी पं.रहातेकर ह्यांनी ह्या दर्जेदार पुस्तकाची उत्तम निर्मिती केली आहे.

सद्यकालात शालेय शिक्षणात संस्कृत भाषेला ऐच्छिक भाषा विषयाचा दर्जा देण्यात आला आहे. त्यामुळे विद्यार्थी ह्या संस्कृत विषयाकडे लक्ष देत नाहीत. तरी परंतु शिक्षण खात्याने 'काव्यप्रवाह:' ह्या पुस्तकाची पाठ्येतर संस्कृतसाठी निवड केल्यास विद्यार्थ्यांना ह्या पुस्तकाचा संस्कृतवाढीसाठी निश्चितपणे उपयोग होईल. थोरांनाही हे पुस्तक आकलनीय असून ह्या कवितांमधील काव्यदर्शनाने त्यांच्या मनात संस्कृत भाषेविषयी जिव्हाळा निर्माण होईलच होईल असे मनापासून वाटते.

पंडित स.त्र्यं.रहातेकरांनी त्यांचे गुरु संस्कृत पंडित कै.काळेशास्त्री यांचे कृतज्ञतापूर्वक स्मरण करुन ह्या 'काव्यप्रवाह:' काव्यसंग्रहाची निर्मिती करुन वाचकांना अमोल समाधान देण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांना त्यांच्या भविष्यकालीन प्रगतीदायक लेखनकार्यासाठी माझ्या अनंत शुभेच्छा देताना मला मनोमन आनंद वाटतो.

अनंत केशव देवघरकर
माजी प्राचार्य
महात्मा गांधी विद्यालय
हाशिवरे (रायगड)

# ∞ मनोगत ∞

माझे वडील ती.त्र्यंबक नारायण रहातेकर हे ब्रिटीश काळातील तलाठी. त्यांचे कडाव येथील वडिलार्जित घरात ते रहात होते. महाड, जि.रायगड येथे माध्यमिक शाळेत शिकत असताना कौटुंबिक कारणामुळे १९१५ साली मॅट्रिकचे वर्गात जाऊन त्यांनी शाळा सोडली. त्यांचा संस्कृत व्याकरणाचा चांगला अभ्यास होता. त्याकाळी शिक्षणाचा दर्जा फार उच्च होता. १९४२-४३ साली कडाव येथील गणेश मंदिरात कै.कालगावशास्त्रींनी केलेल्या श्रीमत् भागवत सप्ताहाचा त्यांचेवर खूप प्रभाव पडला. संहिता-पुराण श्रवणात ते तल्लीन होत असत. शास्त्रीजींनी जाताना त्यांचा ग्रंथ त्यांना प्रसाद म्हणून दिला. ते पुढे भागवताचार्य झाले. त्यांची भागवतावरील श्रद्धेची महती ऐकून पुणे येथील प्रवचनकार कै.जी.आर.पुरंदरेशास्त्री आमचे घरी मुक्कामास येऊन दोघेही भागवतावर चर्चा करीत असत.

त्यांचे महाड येथील शाळेत संस्कृत चांगले असल्यामुळे भागवतातील टीकेवरुन त्यांना भागवत चांगले समजत असे. त्यांनी मला मी मराठी चवथीत असताना संपूर्ण १२ स्कंदांची संथा दिली. प्रारंभिक व्याकरण शिकविले व शब्दांची रूपे पाठ करुन घेतली. त्याचा उपयोग मला माझ्या कर्जत येथील शाळेत १९४८ मध्ये इंग्रजी चवथीपासून (हल्लीची आठवी) झाला. १९५१-५२ मध्ये मी मॅट्रिक (११वी) झालो. माध्यमिक शाळेत असताना वडिलांनी मला त्यांचेकडे असलेल्या भांडारकरांच्या पुस्तकावरुन अभ्यास करण्यास सांगितले. मला दहावीत संस्कृत भाषा प्रदीप हे पुस्तक होते. ते माझ्याकडे आजही आहे. मी शाळेत असताना दादरहून न्यू अँड सेकंडहँड बुक डेपोतून कृ.भा.वीरकर यांची सुलभ शब्दरुपकोश व सुलभ धातुरुपकोश मिळविले. गिरगावातून ओकांचा गीर्वाणलघुकोश आणला. भांडारकरांचे जुने पुस्तक,

लोंढे यांचे पुस्तक अशी पुस्तके मिळविली. वीरकरांचा तिसरा भाग कोठेही मिळत नव्हता. तो मला १९९९ चे सुमारास माझे त्यावेळचे संस्कृत शिक्षक कै.दि.गो.मुळे यांचे संग्रहातून त्यांचे नातेवाईकांकडून मिळाला. तसेच गोडबोल्यांचे वृत्तदर्पण मिळविले. १९५१ मध्ये ब्रिटीशकालीन पुस्तके चालू होती. बदलास नुकतीच सुरवात झाली होती.

माझ्या रेल्वेच्या प्रदीर्घ अत्यंत जबाबदारीच्या सेवाकाळात संस्कृतकडे लक्ष देण्यास जमले नाही. मात्र माझ्या अंत:करणातून ते गेले नव्हते. अकरावीत असताना रघुवंशातील दुसऱ्या सर्गातील 'दिलीप परीक्षा' हा काव्यांश सिलेक्शन पुस्तकात समाविष्ट होता. ते काव्य व इतरही काव्ये माझी आजही मुखोद्गत आहेत. हे काव्य मी अनेकवेळा गुणगुणत असे.

कर्जत येथील निवृत्त संस्कृत शिक्षक, रोहे येथील संस्कृत पाठशाळेत कै.पांडुरंगशास्त्री आठवले यांचे सहअध्यायी असलेले व महाराष्ट्र शासनाचे संस्कृत पंडीत म्हणून गौरविलेले कै.मो.के.काळेशास्त्री यांचेकडून मला खूप शिकण्यास मिळाले. वृत्तातील ओळीतील लघु, गुरु ही अक्षरे कशी ओळखायची व अक्षरे कशी मोजावयाची वगैरे भरपूर माहिती दिली. ते म्हणत असत, तुम्हाला ज्या वृत्तात रचना करावयाची आहे किंवा ज्या वृत्ताकडे आपला नैसर्गिक ओढा आहे त्या वृत्तातील एखादे काव्य आपण सतत गुणगुणावयास हवे. म्हणजे अशी स्थिती निर्माण होते की जणू शब्दच आपली वाट पहात आहेत काय असे वाटते. ते आपोआप तुमच्याकडे वळतील. मला याचा अनुभव आला आहे व येत आहे. वर लिहिल्याप्रमाणे 'दिलीप परीक्षा' हे काव्य नकळत मी गुणगुणत असे. त्यावेळी हे काव्य उपजाति वृत्तात आहे हे मला माहितही नव्हते. आज माझ्या सर्व रचना उपजाति वृत्तातच आहेत. किरकोळ रचना 'अनुष्टुभ्' मध्ये आहेत. हे माझ्या या पुस्तकावरुन लक्षात येईल. हे माझे तिसरे पुस्तक आहे. तीन वर्षांपूर्वी संस्कृतातून असलेले पहिले

विनोदांचे पुस्तक लातूर येथील विद्याभारती या प्रकाशनाने प्रकाशित केले आहे. दुसरे संस्कृत-मराठी ९० विनोदांचे पुस्तक हृषिकेश प्रकाशन कर्जत यांनी दि.१-५-२०१६ रोजी प्रकाशित केले आहे. या पुस्तकाबद्दल अनेकांनी दूरध्वनीने व काहींनी पत्रे पाठवून माझी प्रशंसा केली आहे. रामटेक येथील संस्कृत विश्वविद्यालयाने सदर ग्रंथ हा अभ्यासकांच्या व पर्यायाने विश्वविद्यालयाच्या दृष्टीने अत्यंत उपयुक्त असल्याचे मला कळविले आहे. सर्व प्रशंसा सरस्वतीचरणी समर्पित आहेत.

सन १९९७ मध्ये कर्जत येथील मेघदूत मंडळाच्या सदस्या सर्व विदुषी १) श्रीमती मृदुला गडनीस २) श्रीमती अनुपमा कुळकर्णी ३) कै.सुलभा जोगळेकर ४) सौ.विलासिनी आरेकर यांना माझ्याबद्दलची काही माहिती मिळाल्याने त्यांनी मला एकदा त्यांच्या बैठकीत बोलाविले होते. त्यांनी सांगितले तुम्ही लिहा, आम्ही प्रसिद्ध करु. पुढे काळेशास्त्री यांनीही सांगितले की तुम्हाला लिहित गेल्याशिवाय संस्कृत कळणार नाही आणि मी लिहिण्याचा प्रयत्न केला. १९९७ साली माझा पहिला विनोद प्रसिद्ध झाला. पुढे माझा विश्वास वाढत गेला. लिहिण्यासाठी काय करावे असा प्रश्न पडला. विनोद लिहिणे चालूच ठेवले. परंतु काव्यांकडे माझा जास्त ओढा होता. तेव्हा मी अनेक व्यक्तींचे आदर्श डोळ्यासमोर ठेवून त्यांच्या चरित्रावर लिहिण्याचा प्रयत्न केला व म्हणूनच या पुस्तकात चरित्रमाला लिहिली गेली. काही राष्ट्रीय व सामाजिक विषयावरही लिहिली गेली. उपजातिवृत्ताचा इतका ठसा डोक्यात बसला आहे की काही विनोद, पत्रे, कूटप्रश्न इ. सुद्धा या वृत्तात लिहिली गेली. या काव्यातील काही वैशिष्ठ्ये -

१) महाकवी कालिदासांच्या कुमारसंभवातील 'रात्रिर्गमिष्यति भविष्यति सुप्रभातम्' या वसंततिलका वृत्तातील काव्याचा 'समाप्य रात्रिर्भविता प्रभातम्' हा उपजाति वृत्तात रचण्याचा प्रयत्न 'कुमारमानसम्' या काव्यात

अकराव्या श्लोकात केला आहे.

२) ग्रह् धातूचा परोक्षभूतकाळात परस्मैपदी व आत्मनेपदी जग्राह व जगृहे असा प्रयोग 'समाजदीपिका गौरवम्' या काव्यातील अकराव्या श्लोकात केला आहे.

३) विश्वदूतौ या काव्यातील यम व नियम या शब्दांत श्लेष अलंकार साधला आहे. तसेच पोलिसांसाठी एकमेकांच्या विरुद्ध अर्थ दाखविणारा रक्षक हा शब्द 'श्लिष्ट' म्हणून समजला जाण्यास योग्य असावा.

४) वर्तमानपत्रातील माहिती मिळवून ती संस्कृतात उपजातिवृत्तात अनुवादित करुन सीमोल्लंघनं, सौहार्दयात्रा, हृदयराज गौरवं इत्यादी काव्यांच्या रचना केल्या आहेत.

मला लिहिण्यास प्रवृत्त करणाऱ्या वर उल्लेख केलेल्या सर्व मेघदूतमंडळाच्या सदस्या, माझे भ्रमणसाथी प्रसिद्ध चित्रकार, निवृत्त पोस्टमास्तर कै.रं.के.टेंभुर्णीकर, माझे स्फुटलेखनास प्रसिद्धी देणारी संस्कृत नियतकालिके, विशेषत: अहमदनगर येथील गुञ्जारव या त्रैमासिकाचे मुख्य संपादक महामहोपाध्याय डॉ.दे.खं.खरवंडीकर या सर्वांचा मी ऋणी आहे. संस्कृतमुद्रित-शोधक श्री. राजेन्द्र दातार तसेच अक्षरजुळणीकार श्री. रमण पंढरीनाथ गांगल, माझ्या विनंतीस मान देऊन प्रस्तावना देणारे श्री.अनंत केशव देवघरकर, निवृत्त प्राचार्य व हितचिंतकांचे मन:पूर्वक आभार. धन्यवाद !

ह्या काव्यप्रवाहात अनवधानाने काही त्रुटी, मुद्रणदोष राहिले असतील तर ते रसिकांनी क्षमाशील राहून निदर्शनास आणून द्यावेत, ही विनंती. धन्यवाद !

सदाशिव त्र्यंबक रहातेकर,
कर्जत, जि.रायगड

# अनुक्रमणिका

## ❧ अर्पणपत्रिका ❧

**माझे वडील भागवताचार्य स्व.त्र्यंबक नारायण रहातेकर व**
**माझे गुरु राष्ट्रीय संस्कृत पंडित, मराठी-संस्कृत शब्दकोशकार**
**स्व.मोरेश्वर केशव काळे शास्त्री, ज्यांच्या प्रेरणेने व मार्गदर्शनाने**
**माझी लेखणी संस्कृत सेवेसाठी कार्यरत झाली**
**त्या माझ्या गुरुद्वयांचे पुण्यस्मृतीस हे काव्यपुष्प अर्पण.**

सदाशिव त्र्यंबक रहातेकर

# १. स्वातन्त्र्यवीरगौरवम् ।

(उपजातिवृत्तम्)

(स्वा.वी.सावरकरजयन्तीनिमित्तं २८/५/२००२ समर्पित आदराञ्जलिः।)

**अस्तु प्रणामश्चरणारविन्दे । स्वातन्त्र्यवीरस्य विनायकस्य ।।**
**दामोदरस्यैष महान् सुपुत्रः। ग्रामे भगूरे जननं स लेभे ।।१।।**

**स्वाधीनता वा खलु केन लब्धा । युद्धं विना नीतिरियं तथैव ।।**
**विहत्य हत्वाऽऽमरणं प्रयोत्स्ये । धैर्येण चोक्तं नु विनायकेन ।।२।।**

**युद्धप्रशिक्षाग्रहणार्थमेव । विशन्तु सैन्ये स बभाण यूनः ।।**
**चित्ते क्रियायां घनदेशभक्त्या । क्रान्तिः सशस्त्रा भविता स्वदेशे ।।३।।**

**धैर्येण चाङ्ग्लाच्च पलाय्य शूरः । चिक्षेप देहं ततसागरेऽसौ ।।**
**पलायनं छत्रपतेः स्मृतं तद् । चाग्रापुराद्यावनबन्दिवासात् ।।४।।**

**सोढाः कुपीडा विपुलाप्यनेन । तैलं प्रकर्तुं वृषभीकृतः सः ।।**
**आजन्मकारागृहवासदण्डः । दत्तो द्विवारं च विनायकाय ।।५।।**

**अस्पृश्यताया विनिवारणाय । भाषाविशुद्ध्यर्थमसौ जनेषु ।।**
**चकार यत्नान् बहु शंसनीयान् । रत्नागिरिस्थाननिबद्धकाले ।।६।।**

**स्वदेशभक्तः किल लेखकोऽयम् । कविः स नूनं प्रतिभाविशिष्टः ।।**
**स्वदेशभक्तिः फलिता च तस्य । काव्येषु नाट्येषु निबन्धनेषु ।।७।।**

**सम्मेलनाध्यक्षपदे बभाषे । साहित्यकारान् विबुधान् समस्तान् ।।**
**गृह्णीत यूयं स्वकरे भुशुण्डीः । सम्भिद्य हस्तैस्तव लेखनीस्ताः ।।८।।**

**भोः सागर त्वं नय मातृभूमिम् । काव्यं प्रसिद्धं रचयाम्बभूव ।।**
**विलिख्य कारागृहभित्तिकायाम् । दिदेश वृत्तिं घनराष्ट्रभक्तेः ।।९।।**

**प्राप्तुं स्वराज्यं युयुधे प्रदीर्घम् । विचिन्त्य नैवं स्वगृहं कदापि ।।**
**चाफेकराणां किल कण्ठपाशः । प्राचोदयद्राष्ट्रविमुक्तयेऽरेः ।।१०।।**

**अन्त्यक्रियाकर्म न तस्य मान्यम् । आङ्ग्लप्रशंसा रुरुचे न तस्मै ।।**
**विज्ञाननिष्ठादिगुणाश्च नाना । आसन्नु तस्मादनुशिक्षितव्याः ।।११।।**

**आरोप्य दोषांश्च विनायकेऽस्मिन् । गान्धीवधार्थं न्वपमानितोऽसौ ।।**
**स्वतन्त्रतायै व्यदुनोत् स्वदेहम् । मृत्युञ्जयं तं प्रणमन्ति लोकाः ।।१२।।**

**ताश्कन्दपुर्यां गमनं न कार्यं । विज्ञापितः शास्त्रिवरोऽपि तेन ।।**
**जितस्य देशस्य समर्पणाय । हस्ताक्षरं तस्य बलेन चाप्तम् ।।१३।।**

**देशः ससिन्धुः प्रभवेदखण्डः । प्रदर्शितान्ते महती मनीषा ।।**
**दत्ता न किं भारतरत्नसञ्ज्ञा । तस्मै नृवीराय विनायकाय ।।१४।।**

**मृत्युं पराजित्य विवेश शूरः । मुखं नु तस्यात्मसमर्पणेन ।।**
**लोकाः स्मरेयुर्वचसा प्रभाते । विनायकं तं चिरवन्दनीयम् ।।१५।।**

अनुवाद- (१. स्वातन्त्र्यवीरगौरवम् )

स्वातन्त्र्यवीर विनायकराव सावरकर यांचे चरणकमलांवर माझे प्रणाम. भगूर नावाच्या खेड्यात जन्मलेले ते दामोदरपंतांचे महान् सुपुत्र होते. ।।१।।

युद्धाशिवाय स्वातन्त्र्य कोणास मिळाले आहे का? अहो ती नीतीच आहे ! 'मारिता मारिता मरेतो झुंजेन' हे विनायकाने मोठ्या धैर्याने (कोणाचीही तमा न बाळगता) म्हटले होते. ।।२।।

'युद्धाचे शिक्षण प्राप्त करुन घेण्यासाठीच सैन्यात शिरा' असा त्यांनी तरुणांना

उपदेश केला. स्वत:च्या अंत:करणातील व कृतीतील अत्यंत प्रखर अशा देशभक्तीनेच देशात सशस्त्र क्रांती घडेल असे सांगितले. ।।३।।

अत्यंत धैर्याने इंग्रजांच्या तावडीतून निसटून या शूराने विशाल पसरलेल्या सागरात आपला देह झोकून दिला. आग्र्याहून मुसलमानांच्या बंदीगृहातून छत्रपती

शिवाजी महाराजांच्या पलायनाची आवठण करुन देणारी ही घटना आहे. ।।४।।

त्यांनी खूप पीडा सोसली. तेलगाळण-प्रक्रियेत त्यांना (कोलूच्या घाण्याला जुंपून) बैलही केले गेले. त्यांना दोनदा जन्मठेपेची शिक्षा ठोठावली गेली.।।५।।

अस्पृश्यतेचे निवारण करण्यासाठी तसेच भाषाशुद्धीसाठी त्यांनी रत्नागिरीतील स्थानबद्धतेच्या काळात फार प्रशंसनीय असे कार्य केले. ।।६।।

ते देशभक्त, लेखक तसेच प्रतिभाशाली कवी होते. त्यांची काव्ये, नाटके तसेच निबंधातून देशभक्तीच फलद्रूप झालेली दिसते ।।७।।

मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरुन त्यांनी विद्वानांना, साहित्यकारांना उपदेश केला ''लेखण्या मोडा व बंदुका हातात घ्या''. ।।८।।

'ने मजसी ने परत मातृभूमीला, सागरा प्राण तळमळला' हे प्रसिद्ध काव्य त्यांनी रचले. तुरुंगातील भिंतीवरही काव्ये लिहून त्यांनी आपली प्रखर राष्ट्रभक्ती दाखविली.।।९।।

स्वतःच्या घरादाराचा किंचितही विचार मनात न आणता त्यांनी स्वराज्यप्राप्तीसाठी दीर्घकाळ लढा दिला. शत्रूपासून आपल्या देशाची मुक्तता करण्यासाठी चाफेकरांच्या फाशीने त्यांना प्रेरणा दिली (मिळाली) ।।१०।।

अंत्यक्रियाकर्म त्यांना मान्य नव्हते. इंग्रजांची केलेली प्रशंसाही त्यांना आवडत नसे. विज्ञानावरील निष्ठा इत्यादी अनेक गुण त्यांचेकडून शिकण्याजोगे होते. ।।११।।

या मान्यवर विनायकरावांवर आरोप ठेवून त्यांना महात्मा गांधीवधाचे बाबतीत अपमानित केले गेले. त्यांनी स्वातंत्र्यप्राप्तीसाठी आपल्या शरीराला खूप छळ सहन करावयास लावले. अशा या मृत्यूंजय सावरकरांचेपुढे लोक नतमस्तक होतात. ।।१२।।

ताश्कंदला जाऊ नका असा सल्ला त्यांनी कै. लालबहादूर शास्त्रींना दिला होता. (काय झाले?) जिंकलेला प्रदेश परत देण्याचे करारावर त्यांची जबरदस्तीने सही घेतली गेली. ।।१३।।

आपल्या सिंधू नदीसह असलेला भारत देश पुन्हा अखंड होवो ही त्यांची अखेरची इच्छा होती. या वीर विनायकाला सरकारने 'भारतरत्न' ही पदवी का बरे दिली नाही? ।।१४।।

मृत्यूला पराभूत करुन हा वीर आत्मसमर्पणाने स्वतःहून त्याचे मुखात शिरला. अशा या चिरवंदनीय वीर विनायकाचे लोकांनी दररोज प्रातःस्मरण करावे. ।।१५।।

*****

# २. विस्फोटगौरवम् ।

(उपजातिवृत्तम्)

**वैशाखमासे तिथिपौर्णिमायाम् । चकार देशः अणुबम्बस्फोटान् ।।**
**ववर्ष बुद्धश्च विहस्य पुष्पैः । रुरोद पाको नु पराक्रमेण ।।१।।**

**प्रदेशपाकः कृतवांश्च सज्जम् । 'घोरिं' विनाशाय च हिन्दुभूमिम् ।**
**किं कारणं भीषयितुं यतन्ते । शत्रोश्च यत्ना विफलीभवन्तु ।।२।।**

**ते गौरवार्हाः खलु शास्त्रविज्ञाः । प्रशंसनीया नु तथा च वन्द्याः ।**
**बहिष्करिष्यन्ति च चेद्विदेशाः। न सन्तु चिन्ताः किमु शोचनीयाः।।३।।**

**विलोक्य शौर्यं निजभारतस्य । प्राशंसयन् तं च जनाः सहर्षम् ।।**
**देशे विदेशे प्रसृतास्य कीर्तिः । स्वर्गस्थिताः सन्तुतुषुश्च देवाः ।।४।।**

**प्रधानमन्त्री च विभाति देशम् । सूनुर्भवान् कृष्णबिहारिणो वै ।।**
**सुशोभते सम्प्रति वाजपेयी । दिशन् बलं चैव जगद्विशालम् ।।५।।**

**अवर्णनीयं खलु कार्यमेवम् । कृतं सुपुत्रेण च भारतस्य ।**
**स्तुवन्तु निन्दन्त्वपि जातकोपाः । जीवेत् सुपुत्रः शरदः शतं च ।।६।।**

अनुवाद- (२. विस्फोटगौरवम् )

वैशाख महिन्याच्या पौर्णिमेला देशाने अणुबाँबचे स्फोट केले. बुद्धाने हासून पुष्पवृष्टि केली व पाकिस्तानला रडू कोसळले. ।।१।।

पाकिस्तानने हिन्दुस्थानच्या नाशासाठी घोरीस सज्ज केले. आम्हास घाबरविण्यासाठी हा प्रयत्न आहे काय? शत्रूचे प्रयत्न विफल होवोत. ।।२।।

ते सर्व शास्त्रज्ञ खरोखरच गौरवास पात्र आहेत. तसेच प्रशंसनीय असून वंदनीय ही आहेत. परदेश जर आमच्यावर बहिष्कार टाकतील तरी चिंता नसावी, त्यात दु:ख करण्यासारखे काय आहे? ।।३।।

आपल्या भारताचा हा पराक्रम पाहून लोकांनी आनंदाने त्याची प्रशंसा केली. देशोदेशी ह्याची (पराक्रमाची) कीर्ती पसरली. स्वर्गातील देव संतुष्ट झाले. ।।४।।

(आज) कृष्णबिहारींचे सुपुत्र प्रधानमंत्री श्री.वाजपेयी ह्या विशाल जगाला सामर्थ्य दाखवीत देशाला प्रकाशमय करून शोभा प्राप्त करून देत आहेत.।।५।।

खरोखरच भारताच्या सुपुत्राने केलेले हे काम अवर्णनीय असे आहे. क्रोधायमान झालेले कोणी स्तुती किंवा निंदा देखील करोत. या सुपुत्राला शंभर शरद ऋतूंएवढे आयुष्य लाभो. ।।६।।

*****

## ३. कार्गील विजयः ।

(उपजातिवृत्तम्)

**सीमाप्रदेशे कार्गीलभागे । प्रवेशयामास कुपाकसेना ।।**
**शान्तिं विनष्टुं नु पुनः प्रवृत्तः । दुर्भाग्यमेतद् खलु भारतस्य ।। १।।**

**नवाजवर्यो वितथं बभाषे। सख्यस्य वार्तां सह भारतेन ।**
**बभूव तप्तं नु हिमं तदानीम् । सैन्ये प्रविष्टे प्रभुभारतस्य ।।२।।**

**संस्था युयुत्साऽस्ति 'अयेसआया'। विनिर्मितास्ति त्रसितुं सदैवम् ।।**
**तेजस्विनं भारतभूप्रदेशम् । पश्यन्तु नीतिं प्रतिवेशिनोऽस्य ।।३।।**

**निनिन्द पाकं नु जगत् समस्तम् । बलप्रवेशस्य च हिन्दुभूमौ ।।**
**लेभे जनिं पाकपृथक्प्रदेशः । द्वेष्टुं स नूनं स्थिरभारतस्य ।।४।।**

**विलोक्य दृश्यान्यपि चित्रवाण्याम् । कार्गीलयुद्धस्य गृहे गृहेषु ।।**
**जनानुकूल्यं ववृधे सवेगम् । उत्साहवन्तो हि नरा बभूवुः ।।५।।**

अजागरीत् पाककृतिश्च लोकान्। ऐक्यं स्वदेशे सुदृढं बभूव ।।
सैन्ये प्रविष्टा बहवो युवानः । विनिन्द्य पाकं खलु भारतारिम् ।।६।।

दासश्च कार्गीलबटालिकौ वै । क्षेत्राणि पाकेन गिलङ्कृतानि ।।
शत्रुं पराजित्य पुनर्गृहीतम्। व्याप्तप्रदेशं पटुभारतेन ।।७।।

अग्न्यस्त्रपातेन पपात वैरी। चमूः कुपाकस्य हता च भूरि ।।
निरस्तधैर्याः प्रपलायिताः स्वे। सन्त्यज्य शस्त्राणि तथा शवानि ।।८।।

काश्मीरदेशे हननं स्वहिन्दून् । प्रचाल्यते भूरि विभाजनात् आ ।।
निर्वासितास्ते बहवः प्रजग्मुः। अनाथधामेषु च रक्षणार्थम् ।।९।।

काश्मीरपृच्छां च निनाय मोघाम् । युनोसभायां स्वजवाहरः किम् ।।
अदात् स देशाय च शीर्षपीडाम्। दुनोति या नः विपुलं सदैवम् ।।१०।।

औरङ्गजेबो महमूदघोरी । आस्तामतिक्रूरनृपौ यथा तौ ।
क्रौर्यं प्रदिष्टं नु नवाजवर्यैः। तीव्रप्रहारैर्व्रणिताश्च बन्द्यः ।।११।।

श्रुत्वा विलापार्तरवान् हि तेषाम् । प्रदाय कष्टं बहु तान् जघान ।।
विच्छिन्नदेहानहिणोत् कुकर्मी ।क्रौर्यं नु हिन्दून् प्रति पाकधर्म : ।।१२।।

राष्ट्रध्वजैरावृतशूरदेहाः। नीता निवासस्थलमेव तेषाम् ।।
अन्त्यक्रियाकर्म चकार शास्ता। वीरोचितं गौरवपूर्वकं वै ।।१३।।

नत्वा शवानर्पित पुष्पमालान् । पुत्राः चिरं नेत्रजलं वहन्तः ।।
त्यक्त्वा विलापं शपथं गृहीत्वा। शौर्यं प्रदेष्टुं युधि कामयन्ते ।।१४।।

चम्वाः कुटुम्बाः खलु ते स्वकीयाः । संवेदनैषाद्य च भारतीयाः ।।
रक्षानुबन्धान् ललनाः प्रहित्य। व्यज्ञापयन् ताः दृढबन्धुभावम् ।।१५।।

आप्त्वा धनं भूरि तदा जनेभ्यः। पन्तप्रधानस्य निधौ व्यधत्त ।।
कल्याणकार्याय च सैनिकानाम् ।तथा च तेषां स्वकुटुंबकानाम् ।।१६।।

क्लिन्टन्वरेण्यं मिलितो नवाजः । क्रान्तप्रदेशं गिलितुं सदैवम् ।।
पन्तप्रधानो विरुरोध गन्तुम् । पाकप्रधानो विफलीबभूव ।।१७।।

निर्माय बाङ्ग्लां निजभारतेन। आमन्त्रितं तेन च पाकरोषम् ।।
प्रदर्श्य वैरं विदुनोति पाकः आलेख्यपत्रादचिरात् प्रमृज्यात् ।।१८।।

पाकात् विचिन्वन्तु च युद्धहानिम्। न्यायालयेऽसौ नयनीय एव ।।
न मध्यमार्गानवलम्बितव्यान् । विश्वासयोग्यो न च पाकदेशः ।।१९।।

पन्तप्रधानाः खलु भूतपूर्वाः। ते राजनीत्यां विफलीबभूवुः ।।
पुनर्ददुर्ये च जितप्रदेशम् । पाकाय सर्वं निजमूढबुध्या ।।२०।।

बन्दीकृता वङ्गविमुक्तियुध्दे । पाकार्पितास्ते किमु भारतेन ।।
आसीत् सुसन्धिश्च विमोचनाय। काश्मीरखण्डं खलपाकदेशात् ।।२१।।

सीमाप्रदेशस्य निरीक्षणं वै । आवश्यकं नित्यमुपग्रहेण ।।
भूनौविमानादिदलत्रयार्थम् । अर्थप्रदानं बहुलीकरोतु ।।२२।।

बोफोर्सनामाति विनाशिकास्त्रम् । उच्चस्थशत्रुं प्रजघान भूरि ।।
नवानि शस्त्राणि ददातु शास्ता। मनोबलं वर्धयितुं चमूभ्यः ।।२३।।

शौर्यं प्रदिष्टेन च शूरवीरैः । प्राप्तानुकूल्येन जनैस्तथैव ।।
वैरीं पराभूय जिगाय देशः । प्रशंसनीयः पटुवाजपेयी ।।२४।।

पाकोऽस्ति देशो जनकोग्रवादी। उद्घोषयेत् सत्यमिदं जगद्वै ।।
अमेरिकाचीनरुसादिदेशाः । उद्घोषणार्थं किमु वर्जयन्ते ।।२५।।

**पराभवो भूरि च तेन लब्धः । तथापि पाको युयुधे किमर्थम् ?**
**जानाति किं नैव स सत्यमेतद्। शुनः स्वपुच्छं सरलीभवेत्किम् ।।२६।।**

**युद्धाङ्गणे ये निहता युवानः । ते वीरपुत्रा ननु भारतस्य ।।**
**संरक्षणार्थं निजमातृभूमिम्। कृतार्पणं तैर्भविता न मोघम् ।।२७।।**

**भवेदखण्डः पुनरेव देशः । वङ्गस्तथा भारतपाकयोर्वै ।।**
**स्वातन्त्र्यवीरेण विनायकेन। उक्ता मनीषा सफलीप्रभूयात् ।।२८।।**

अनुवाद- (३. कारगीलविजयः)

सीमा भागातील प्रदेशात दुष्ट पाकिस्तानच्या सैन्याने प्रवेश केला. पुन्हा एकदा भारतातील शान्ती नाहिशी करण्यासाठी प्रयत्न केला गेला. खरोखरच भारताचे हे दुर्दैवच! ।।१।।

भारताबरोबरच्या मैत्रीची नवाज शरीफांची भाषा फोल ठरली. बलवान अशा भारतीय सैन्याचा प्रवेश होताच (कारगीलमधील) बर्फ तापू लागले. ।।२।।

तेजस्वी भारताला सतत छळण्यासाठीच पाकिस्तानात आय.एस.आय. या युद्धखोर संस्थेची निर्मिती झाली आहे. पहा या शेजाऱ्याची कशी नीती आहे. ।।३।।

जबरदस्तीने हिंदुस्थानात शिरल्याबद्दल सर्व जगाने पाकिस्तानची निंदा केली. पाकिस्तान या वेगळ्या भागाचा जन्मच, स्थिर भारताच्या द्वेषासाठी आहे. ।।४।।

घराघरातून कारगील युद्धाची दृश्ये दूरदर्शनवर पाहिल्यामुळे लोकांची (सरकारबद्दलची) अनुकूलता त्वरीत वाढली व लोक (अति) उत्साही झाले. ।।५।।

पाकिस्तानच्या या कृतीने (आपले) लोक जागृत होऊन त्यांच्यातील एकी मजबूत झाली. भारताचा शत्रू असलेल्या पाकिस्तानची निंदा करुन तरुण वर्ग बहुसंख्येने सैन्यात दाखल झाला. ।।६।।

कारगील बटालीक व द्रास इत्यादी ठाणी पाकिस्तानने गिळंकृत केली (परंतु) चतुर वृत्तीच्या भारताने शत्रुचा पराभव करुन ती पुन्हा आपल्या ताब्यात घेतली. ।।७।।

दुष्ट पाकिस्तानचे सैन्य खूप मारले गेले. बाँब हल्ल्याने वैरी कोसळला. धीर

खचलेले काही सैनिक तर शस्त्रे व प्रेते सोडून पळून गेले. ।।८।।

फाळणीपासूनच काश्मीरात आपल्या हिंदुंची हत्या चालत आली आहे. स्वरक्षणासाठी अनेक निराश्रित, निर्वासित छावण्यांमध्ये दाखल झाले. ।।९।।

आपले जवाहरलाल नेहरु काश्मीर प्रश्न व्यर्थ युनोत कशासाठी घेऊन गेले? त्याने भरपूर छळणारी डोकेदुखी या देशास दिली. ।।१०।।

औरंगजेब व महंमद घोरी ज्याप्रमाणे अतिक्रूर राजे होऊन गेले त्याप्रमाणे नवाज शरीफांनी युद्धबंद्यांवर तीव्र आघात करुन त्यांना जबर जखमी केले व आपल्या क्रौर्याचे प्रदर्शन केले. ।।११।।

त्या युद्धबंद्यांच्या दु:खद किंकाळ्या ऐकून सुद्धा त्यांना हालहाल करुन ठार मारले. या कुकर्म्याने त्यांचे देह छिन्नविच्छिन्न करुन इकडे पाठविले. (अहो!) हिंदुंशी क्रौर्य हा पाकिस्तानचा धर्मच आहे. ।।१२।।

राष्ट्रध्वजात लपेटलेली त्या शूरांची पार्थिवे त्यांचे घरी आणली गेली. संपूर्ण वीरोचित, गौरवपूर्वक, शासकीय पद्धतीने त्यांचा अंत्यसंस्कार करण्यात आला. ।।१३।।

पुष्पमाला अर्पित केलेल्या (आपल्या वडिलांच्या) शवांपुढे नतमस्तक होऊन बराच वेळ खूप दु:खाश्रू वाहत असणारे (त्यांचे) पुत्र, शोक सोडून, शपथपूर्वक सैन्यात दाखल होऊन शौर्य दाखवू इच्छितात. (ही वस्तुस्थिती दिसते) ।।१४।।

सैन्याचे कुटुंब हे आपलेच कुटुंब आहे ही भारतवासीयांची संवेदना आहे. स्त्रियांनी राख्या पाठवून आपल्या बंधुत्वाची (सैनिकांना) जाणीव दिली.।।१५।।

सैनिक व त्यांचे स्वत:च्या कुटुंबियांच्या कल्याणासाठी लोकांकडून विपूल पैसा जमा करुन तो पंतप्रधानांच्या निधीत जमा केला. ।।१६।।

आक्रमण केलेला भूभाग कायमचा गिळंकृत करण्याचे हेतूने नवाज शरीफ (अमेरिकाध्यक्ष) क्लिंटन यांना भेटले (भारताचे) पंतप्रधानांनी तेथे जाण्यास (ठाम) विरोध केला. त्यामुळे पाक पंतप्रधानांचे (कारस्थान) असफल झाले. ।।१७।।

आपल्या भारताने बाङ्गलादेशाची निर्मिती करुन पाकिस्तानच्या (आपल्यावरील) रोषास आमंत्रण दिले. दुष्ट प्रवृत्तीचे प्रदर्शन करुन पाकिस्तान (आपल्याला छळत) आहे. नकाशातून लवकरच (पाकिस्तानला)पुसून टाकावे.।।१८।।

पाकिस्तानकडून युद्धात आपले झालेले नुकसान वसूल करावे. त्याला (आंतरराष्ट्रीय) न्यायालयासमोर उभे करावे. कोणत्याही तडजोडी स्वीकारु नयेत. (कारण) पाकिस्तान हा विश्वास ठेवण्याच्या योग्यतेचा नाही. ।।१९।।

पूर्वी झालेले पंतप्रधान राजनीतीत खरोखरच असफल ठरले. ज्यांनी स्वत:च्या मुर्खपणाने जिंकलेला सर्व प्रदेश पाकिस्तानला पुन्हा परत दिला. ।।२०।।

बाङ्गला मुक्तिसंग्रामातील युद्धबंदी भारताने पाकिस्तानच्या पुन्हा हवाली केले. काय सांगावे! दुष्ट पाकिस्तानपासून काश्मीरचा तुकडा मुक्त करण्यासाठी चांगली संधी होती. ।।२१।।

नेहमी उपग्रहाद्वारे सीमा प्रदेशाची तपासणी (करणे) आज अत्यावश्यक आहे. भूदल, नौदल व वायुदल या सर्वांसाठी भरपूर पैसा द्यावा. ।।२२।।

बोफोर्स नावाच्या विनाशकारी तोफांनी उंचावर असलेल्या शत्रूचा मोठ्या प्रमाणावर नि:पात केला. सरकारने (अत्यंत) आधुनिक शस्त्रास्त्रे आपल्या सैन्यास त्यांचे मनोबल वाढण्यासाठी द्यावीत. ।।२३।।

(आपल्या) शूरवीरांनी दाखविलेल्या शौर्याने तसेच लोकांच्या पाठिंब्यामुळे, शत्रूला हरवून आपला देश जिंकला. चतुर वाजपेयी खरोखरच प्रशंसापात्र आहेत.।।२४।।

पाकिस्तान हा दहशतवादाचा जन्मदाता आहे. हे सत्य जगाने जाहीर करावे. अमेरिका, चीन, रशिया इ. देश अशी घोषणा करण्याचे का बरे टाळत आहेत? ।।२५।।

(पूर्वी) त्याने चांगलाच पराभव अनुभवलेला असतानाही पाकिस्तान कशासाठी लढला? हे सत्य तो जाणत नाही काय? (परंतु) कुत्र्याचे शेपूट कधी सरळ होईल काय? ।।२६।।

युद्धभूमीवर जे तरुण धारातीर्थी पडले ते खरोखरच भारतमातेचे वीर सुपुत्र होत. आपल्या मातृभूमीच्या रक्षणासाठी ज्यांनी आपले देह अर्पण केले त्यांचे बलिदान कधीही व्यर्थ होणार नाही. ।।२७।।

बाङ्गला देश, तसेच भारत व पाकिस्तान यांचा पुन्हा अखंड देश होवो. स्वातंत्र्यवीर विनायकराव सावरकरांनी वर्तवलेली (त्यांची) इच्छा सफल होवो. ।।२८।।

*****

# ४. सौहार्दयात्रा ।

(उपजातिवृत्तम्)

अस्त्यद्यबाङ्ग्ला खलु पूर्वपाकः। चकास्ति प्राच्यां दिशि भारतस्य ।।
विभाति शेखाहसिनावरेण्या। प्रधानमन्त्री प्रियभाषिणी सा ।।१।।

षष्ठ्यां तिथौ ज्येष्ठसुदि प्रभाते। रेल्वेसचीवैश्च नितीशवर्यैः ।।
उद्घाटितासीत् बसयानसेवा। मध्ये द्वयोर् भारतबाङ्ग्लयोश्च ।।२।।

शोभायितं वै बसयानमेतद्। पुष्पैस्तथा स्थापितदीपहारैः ।।
विशेषयाने प्रसृतं सुगन्धम्। गीतानि नेदुः ध्वनिमुद्रितानि ।।३।।

आम्लानदत्तो नु वसन्तवर्यः। वङ्गस्य मन्त्री विबुधः सुभाषः ।।
ढाक्कापुरं तैर्नु कृतं प्रयाणम् । संवर्धनार्थं दृढबन्धुभावम् ।।४।।

पद्मा वहन्ती यमुना तथा च। पारं प्रकार्याऽपरिहारणीया ।।
प्रस्थाप्यते नावि च यानमेतद् । सेतोरभावाद्धि सरिद्द्वयेऽस्मिन् ।।५।।

पन्तप्रधानोऽवततार ढाक्काम्। विष्ट्वा विमानं शुभराजहंसम् ।।
बाङ्गलाप्रधाना नु मुजीबकन्या। ननन्द सुस्वागतपूर्वमेव ।।६।।

ब्रिजेशमिश्रो जसवन्तसिंहः । कवीन्द्रवर्योऽपि सुमान्यवन्तः ।।
आसन् नु सर्वे सहयात्रिकास्ते। यानप्रवासे ऽटलजीवराणाम् ।।७।।

'सख्यं चिरायुः प्रभवेद्द्वयस्य'। वस्त्रध्वजावैं पथि भूषितास्ते ।।
प्रदर्शिताः सुप्रतिमा अनेका । पन्तप्रधानस्य च मार्गमध्ये ।।८।।

बाङ्गलाप्रधानाटलजीवरेण्यौ । तयोरनेकाः सहयायिनोऽन्ये ।।
सीमास्थरेखामनुगम्य चक्रुः। सुस्वागतं ते बसयात्रिकाणाम् ।।९।।

**उस्माननाम्नि स्मृतिकक्षमध्ये । समागताः पर्यटकाश्च सर्वे ।।**
**'शोनारगीतं' प्रजगुस्तदानीम् । सम्मिल्य देशद्वयबान्धवाः स्वे ।।१०।।**

**पन्तप्रधानश्च नितीशवर्यः । जुघोषतुस्तौ नवरेलमार्गम् ।।**
**देशद्वयेऽस्मिन् वहनाय शीघ्रम् । सख्यं दृढं सम्भवितुं सदैवम् ।।११।।**

**चर्चा प्रदीर्घा हितवर्धनार्थम् । भूता तदानीमुभयप्रदेशे ।।**
**शतद्विकोटिश्च ऋणप्रदानम् । सम्मानितं वै निजभारतेन ।।१२।।**

**बाङ्गलाप्रधाना नियुयोज भोज्यम् । पन्तप्रधानेन समं तदानीम् ।।**
**ऊहुः सुखाश्रूणि च लोचनाभ्याम् । स्मृत्या रणं-संगविमुक्तियुद्धे।।१३।।**

**राष्ट्राधिकारी प्रददौ सुभोज्यम् । पन्तप्रधानाय च गौरवार्थम् ।।**
**प्राशंसताम् द्वावपि मित्रभावम् । सौहार्दयात्रा सफलीप्रभूयात् ।।१४।।**

**पन्तप्रधानोऽटलजीवरेण्यः । सन्मानितोऽसौ महतादरेण ।।**
**बाङ्गलाप्रदेशस्थितसर्वलोकाः। अर्हन्ति लब्धुं नितरां प्रशंसाः ।।१५।।**

<u>अनुवाद- (४. सौहार्दयात्रा )</u>

(नकाशात) भारताच्या पूर्वेस चमकणारा आजचा बांगला देश हा पूर्वीचा पूर्वपाक होय. मधुरभाषिणी शेख हसीना महोदया पंतप्रधानाचे स्थानी शोभत आहेत. ।।१।।

(सन १९९९) ज्येष्ठ शुद्ध षष्ठीच्या प्रभात समयी रेल्वेमंत्री मा.नितीशकुमार यांनी भारत व बांगला या दोन देशांमधील बस सेवेचे उद्घाटन केले. ।।२।।

ही बस फुलांच्या व दिव्यांच्या माळांनी सजविली होती. या खास सजविलेल्या बसमधील वातावरण सुगंधी असून आत ध्वनीमुद्रिकांतील श्रवणीय गीते (मधुर स्वरांत) ऐकविली जात होती. ।।३।।

दोन देशांमधील बंधुभाव वृद्धिंगत व्हावा या हेतूने सुरु केलेल्या या बसमधून, मा.अम्लानदत्त, वसंत चौधरी, पश्चिम बंगालचे वाहतूक मंत्री श्री.सुभाष चक्रवर्ती या

सर्वांनी ढाक्यापर्यंत प्रवास केला. ।।४।।

सतत वाहणाऱ्या पद्मा व यमुना या दोन पद्मा पार करुन जाणे अपरिहार्य असते. दोन्ही नद्यांवर पूल नसल्याने बस नावेत ठेवून पलीकडे न्यावी लागते. ।।५।।

पंतप्रधान वाजपेयींचे राजहंस विमानातून ढाक्यास आगमन झाले. बांगला देशाच्या प्रधानमंत्री पै.मुजीबुर्रहिमान यांच्या सुकन्येने त्यांचे हार्दिक स्वागत केले. ।।६।।

पंतप्रधानांचे मुख्य सचिव मा.ब्रिजेश मिश्र, (परराष्ट्रमंत्री) मा.जसवंत सिंह, (दूरसंचारमंत्री) कवींद्र पुरकायस्थ इत्यादी सर्वांनी पंतप्रधानांच्या समवेत (राजहंस) विमानातून प्रवास केला. ।।७।।

दोन्ही देशांमधील मैत्री चिरायु होवो अशा घोषणांचे कापडी ध्वज ढाका शहरात रस्तोरस्ती फडकत होते. तसेच रस्तोरस्ती मा.वाजपेयींच्या प्रतिमा लावल्या होत्या.।।८।।

दोन्ही देशांच्या पंतप्रधानांनी आपल्या अनेक सहकाऱ्यांसह सीमेवर जाऊन बसमधून आलेल्या प्रवाशांचे स्वागत केले. ।।९।।

या बसमधून आलेले सर्व प्रवासी उस्मानी मेमोरियल हॉलमध्ये एकत्र आले. दोन्ही देशाच्या लोकांनी अत्यंत आनंदाने शोणार बांगला हे राष्ट्रगीत गायले. ।।१०।।

मैत्री दृढ होण्यासाठी, तसेच जलद वाहतूक होण्यासाठी मा.पंतप्रधान वाजपेयी व रेल्वेमंत्री मा. नितीशकुमार या दोघांनी दोन्ही देशांमध्ये नवीन रेल्वेमार्ग सुरु करण्याची घोषणा केली. ।।११।।

त्यावेळी दोन्ही देशांच्या हिताच्या दृष्टीने प्रदीर्घ चर्चा झाली. आपल्या भारताने दोनशे कोटी रुपयांचे कर्ज बांगलादेशासाठी देण्याचे मान्य केले. ।।१२।।

पंतप्रधानांसमवेत बांगलादेश पंतप्रधानांनी सहभोजन आयोजित केले होते. बांगला मुक्ति युद्धातील आठवणीने बांगला प्रधानमंत्र्यांना गहिवरुन आले व त्यांच्या डोळ्यातून आनंदाश्रू वाहू लागले. ।।१३।।

बांगला देशाच्या राष्ट्रपतींनी भारताचे पंतप्रधानांसाठी भोजन आयोजिले होते. दोघांनीही आपापल्या मैत्रीची प्रशंसा केली. (अशी) ही सौहार्दयात्रा सफल होवो.।।१४।।

पंतप्रधान अटलजींचा अत्यंत आदरपूर्वक सन्मान केला. त्याबद्दल बांगलादेश- वासीय सर्वजण खरोखरच प्रशंसेस पात्र आहेत. ।।१५।।

*****

## ५. सीमोल्लङ्घनम् ।

(उपजातिवृत्तम्)

**लाहोर-दिल्ली बसयानसेवाम् । प्रारम्भयत् भारतमुख्यमन्त्री ।।**
**स्वयं प्रविष्टो निकटस्थपाकम् । चिराय सख्याय तथा सुखाय ।।१।।**

**सुवर्णवर्णा बसयानसेवा । आसीत् सदा-ए-सरहद्दनामा ।।**
**याने प्रविष्टेऽटलजीवरेण्ये । तालाः कराणां निनदुः समन्तात् ।।२।।**

**शत्रुघ्नसिंहो जसवन्तसिंहः । शीलाब्रिजेशप्रभृतिश्च मान्याः ।।**
**आसन् तदानीं सहगामिनो वै । ते पाकयाने सह मन्त्रिभिश्च ।।३।।**

**अपावृतं द्वारमतिप्रमोदात् । वाघाख्यभूम्यां नु नवाजवर्यैः ।।**
**नवाजवर्योऽटलजीवरेण्यौ । प्रशंसितुं तौ भवतश्च पात्रौ ।।४।।**

**उच्चारिते द्वे निजराष्ट्रगीते । देशद्वयेनातिविनम्रभावैः ।।**
**ध्वजान् त्रिवर्णान् गगने प्रदर्श्य । बालाः सहर्षाश्च तदा ननर्तुः ।।५।।**

**ध्वजद्वयं व्योम्नि ततो रराजे । सुस्वागतायाटलजीवराणाम् ।।**
**ववर्ष पुष्पाणि बहूनि मार्गे । प्रसार्य गन्धं लघुवायुयानम् ।।६।।**

**सीमासुरक्षादलसैनिकेषु । नारीदलं शूरतमं ननर्त ।।**
**पञ्जाबनृत्यं श्रुतभाङ्गडाख्यम् । पाकप्रदेशे पटुमन्त्रिणोऽग्रे ।।७।।**

**पञ्जाबभूम्याः सुमृदं गृहीत्वा । समर्पितां तां प्रियपाकभूम्यै ।।**
**काव्यानि तेषामनुवादितानि । ऊर्दूगिराऽहो किल गौरवार्थम् ।।८।।**

**अग्रेसरत्वं स्पृहणीयमेतम् । न दर्शितं केन च पूर्वकाले ।।**
**शान्तिं सुरक्षामुभयप्रदेशे । प्रस्थापनार्थं चिरकालिकं वै ।।९।।**

**काश्मीरदेशे हननं विरन्तुम् । नवाजवर्यैः क्रियतां प्रयत्नः ।।**
**निष्पापजीवान् तु बलेन हत्वा। सम्मेलनं(आलिङ्गनं) किं सफलीभवेद्वा।।१०।।**

**वैराय केचित् स्पृहयन्ति देशाः । स्वार्थाय ते भारतपाकमध्ये ।।**
**संरुध्य तेषां निभृतां मनीषाम् । देशद्वयं भूरि भवेद्बलाढ्यम् ।।११।।**

अनुवाद- (५. सीमोल्लङ्घनम् )

भारताच्या पंतप्रधानांनी लाहोर–दिल्ली बसचा शुभारंभ केला. कायमची मैत्री, तसेच निरंतर सुखासाठी त्यांनी आपणहून शेजारी असलेल्या पाकिस्तानात प्रवेश केला.।।१।।

सदा–ए–सरहद्द नावाची सोनेरी रंगाची ही बस होती. सदर बसमध्ये अटलजींचा प्रवेश होताना टाळ्यांच्या कडकडाटाने आसमंत दुमदुमला ।।२।।

शत्रुघ्नसिन्हा, जसवंतसिंग, शीला महोदया, ब्रिजेश मिश्रा इत्यादी मान्यवर त्यावेळी पंतप्रधानांबरोबर पाकिस्तानकडे जाणाऱ्या बसमध्ये सहप्रवासी होते. ।।३।।

नवाजशरीफांनी अत्यंत आनंदित होऊन वाघाभूमीवरील (बॉर्डरवरील) दरवाजा उघडला. नवाजशरीफ व अटलबिहारी हे दोघेही प्रशंसेस पात्र आहेत. ।।४।।

दोनही देशांनी अतिशय नम्रतेने आपापली राष्ट्रगीते गायली. त्यावेळी लहान मुले तिरंगा झेंडा उचलून अत्यंत आनंदाने नाचली. ।।५।।

अटलजींच्या स्वागतासाठी दोन्ही देशांचे ध्वज आकाशात फडकत होते. छोट्या विमानांनी(हेलिकॉप्टर)रस्त्यात सुगंध पसरवीत अनेक फुलांचा वर्षाव केला.।।६।।

पाकिस्तानात सीमा सुरक्षादलातील सैन्यामधील शूर अशा स्त्री पलटणीने पंजाबातील प्रख्यात भांगडानृत्य अटलजींपुढे सादर केले. ।।७।।

पंजाबभूमीतील पवित्र माती घेऊन ती (भारताने) प्रिय पाकिस्तानच्या भूमीस अर्पण केली. प्रधानमंत्र्यांच्या गौरवार्थ त्यांच्या काव्यांचा उर्दूत अनुवाद केला. ।।८।।

दोन्ही देशांमध्ये कायमस्वरुपी शांती व सुरक्षा प्रस्थापनेसाठी वाजपेयींनी

केलेले नेतृत्त्व हे यापूर्वी कोणीही केले नसून ते खरोखरच वाखाणण्याजोगे आहे.।।९।।

काश्मीरमधील हत्या थांबविण्यासाठी नवाजशरीफांनी प्रयत्न करावा. निष्पाप जीवांचा सतत बळी देऊन दोघांचे मीलन (आलिंगन) सफल होईल काय? ।।१०।।

स्वत:च्या स्वार्थासाठी काही देश भारत पाकिस्तानमध्ये शत्रुत्व असावे अशी इच्छा करतात. त्यांचा हा गुप्त हेतू ठोकरुन देऊन दोन्ही देश बलवान व्हावेत.।।११।।

*****

## ६. धर्मवीरगौरवम् ।

(उपजातिवृत्तम्)

**न ज्ञायते केन नरः प्रसिद्धः । ठाणेनगर्यां निवसन् सदैवम् ।।**
**विद्यालये सन् प्रविवेश सेनाम् । आनन्दवर्यः खलु लब्धकीर्तिः ।।१।।**

**त्रिचक्रयानानि वितीर्य तेन । प्रदाय दास्यं च तथा युवभ्यः ।।**
**न्यूनीकृतं निष्क्रियवर्गमेषाम् । प्रशंसनीयं खलु तस्य कार्यम् ।।२।।**

**स्वल्पप्रमाणेन ऋणप्रदानम् । परिश्रमिभ्यः गृहजीवनाय ।।**
**दोलागृहार्थं सुकुटीप्रदानम् । स्त्रीणां तथा सीवनयन्त्रदानम् ।।३।।**

**सहायता तेन च भूरि दत्ता । यथा प्रसङ्गे खलपीडितेभ्यः ।।**
**कुटुम्बवादा विरताः प्रयत्नैः । सम्मिल्य सर्वान् मृदुभाषणेन ।।४।।**

**मार्गप्रसारं महनीयकार्यम् । ठाणेपुरे तेन कृतं वरेण्यम् ।।**
**निस्सार्य पङ्कं नु जलाशयाद्वै । शुद्धीकृतं सर्वजलं तडागे ।।५।।**

**रक्तप्रदाने कृतभूरियत्नः । सत्कारितोऽसौ निजशासनेन ।।**
**सावन्तवर्यैः महतादरेण । तथान्यसंस्थाप्रमुखैस्तदानीम् ।।६।।**

**अभ्यासवर्गाणि च स प्रयुङ्क्ते । छात्रान् कृते माध्यमिकान्तवर्षे ।।**
**अदात् युवभ्यः व्यसनाद्विमुक्तिम् । अवर्धयत् तेषु च सत्प्रवृत्तिम् ।।७।।**

**निसर्गकोपेन स पीडितेभ्य:। द्रव्यं तथा धान्यनिवासमेव ।।**
**युयोज वस्तूनि विना विलम्बम् । मुहुर्मुहुस्ताननुपृच्छ्य सम्यक् ।।८।।**

**स्वहिन्दुधर्मस्य कृते नितान्तम् । आनन्दवर्यः यतते सगर्वम् ।।**
**संरक्षणार्थं बलवर्धनार्थम् । नित्यं प्रजागर्ति च धर्मवीरः ।।९।।**

**माघस्य मासे सुदिपौर्णिमायाम् । दिघेवरेण्यः सहयायिनो वै ।।**
**गच्छन्ति घोषेण मलङ्गदुर्गम् । प्रस्थापनार्थं नवनाथस्थानम् ।।१०।।**

**आन्दोलने कर्मविरामकाले। सेवां जनानां कुरुते सदैवम् ।।**
**चिन्तामणीनिर्मलवंशदीपः । जीवेत् सुपुत्रः शरदः शतं च ।।११।।**

अनुवाद- (६. धर्मवीरगौरवम् )

शिक्षण घेत असताना ज्यांनी शिवसेनेत प्रवेश केला, पुष्कळ कीर्ती संपादन केली, त्या ठाणे शहरात कायम वास्तव्य असलेल्या मा.आनंदराव दिघे या प्रसिद्ध व्यक्तीस कोण बरे ओळखत नाही? ।।१।।

अनेकांना रिक्षा उपलब्ध करुन तसेच तरुणांना नोकऱ्या मिळवून देऊन बेकारी कमी केली. खरोखरच हे कार्य प्रशंसनीय आहे. ।।२।।

घरेलु धंद्यासाठी कष्टकऱ्यांसाठी कमी दराने कर्ज मिळवून दिले. स्त्रियांना पाळणाघरासाठी चांगल्या जागा मिळवून दिल्या. तसेच त्यांना शिवणयंत्रेही उपलब्ध करुन दिली. ।।३।।

दुष्टप्रवृत्तीपासून त्रासलेल्यांना जरुरीच्या वेळी त्यांनी भरपूर मदत केली. (एवढेच नव्हे तर) आपल्या मधुर वाणीने त्यांनी कुटुंबातील सर्वांची एकी करुन त्यांच्यातील भांडणतंटे प्रयत्नपूर्वक मिटविले. ।।४।।

ठाणे शहरातील रस्तारुंदीसाठी त्यांनी फार मोठी कामगिरी केली आहे. तळ्यातील गाळ बाहेर काढून तळी स्वच्छ केली. ।।५।।

रक्तदान शिबिरांसाठी भरपूर मेहनत घेतल्यामुळे आपल्या सरकारने (माजी आरोग्यमंत्री) मा. सावंत यांचे हस्ते त्यांचा आदरपूर्वक सत्कार केला. त्याचबरोबर

त्यांचे अनेक संस्थांकडूनही त्यावेळी सत्कार झाले. ।।६।।

शालांत परीक्षेच्या विद्यार्थ्यांसाठी ते अभ्यासवर्गाची योजना करतात. बऱ्याच तरुणांना त्यांनी व्यसनापासून मुक्त केले व त्यांचे ठिकाणी सत्प्रवृत्ती निर्माण केली.।।७।।

नैसर्गिक आपत्तीने पीडलेल्यांना धन, धान्य, निवारा इ.अनेक सोई तातडीने पुरविल्या. तसेच वारंवार त्यांची विचारपूसही केली. ।।८।।

आपल्या हिन्दुधर्माचे रक्षणासाठी, धर्म बलशाली होण्यासाठी आनंदराव दिघे अत्यंत अभिमानाने सतत प्रयत्नशील असतात. त्यासाठी हा धर्मवीर सतत जागा असतो. ।।९।।

दरवर्षी माघी पौर्णिमेस दिघे महोदय व त्यांचे असंख्य सहकारी मलंगगडावर ते स्थान नवनाथांपैकी आहे हे ठामपणे प्रस्थापित करण्यासाठी घोषणा देत जात असतात. ।।१०।।

जनआंदोलनाचे वेळी तसेच संपकाळात ते लोकांचे सेवेसाठी सदैव तयार असतात. चिंतामणी व निर्मलादेवी यांचे वंशाचा दिवा असलेल्या सुपुत्रास शंभर शरदऋतूंएवढे आयुष्य लाभो. ।।११।।

*****

## ७. हृदयराजगौरवम् ।

(उपजातिवृत्तम्)

(जगत्प्रसिद्धाः हृच्छल्यविशारदाः चिकित्सवराः डॉ.नीतू माण्डके महोदयाः अकाले ५४ वयसि २०/५/२००३ दिनाङ्के हृद्गतिरोधेन भूलोकं विहाय स्वर्गं प्रयाताः । तेषां स्मृत्यै ममाल्पीयान् काव्यपुष्पाञ्जलिरयम् समर्प्यते ।)

**न ज्ञायते केन जगत्प्रसिद्धः । चिकित्सकः शल्यविशारदः सन् ।।**
**जातः सुवंशे श्रुतमाण्डके यः । नीतूवरेण्यो बुधवैद्यराजः ।।१।।**

**हृद्घातरोगात् स ररक्ष रुग्णान् । हृत्तीव्रघातेन परं गतोऽसौ ।।**
**तस्योपयोगः त्रिदिवे भवेद्वा । किं कथ्यते दैवगतिर्विचित्रा ।।२।।**

अहो मृतो नास्ति महोदयोऽयम् । हृद्दानकार्याय दिवं गतोऽसौ ।।
स्वर्गं प्रविष्टोऽस्ति परीक्षणार्थम् । दिवङ्गतानां हृदयानि वाऽसौ ।।३।।

दीपावलीत्युत्सव आगतेऽयम् । आकाशदीपादि विलेपनानि ।।
विक्रीय वस्तूनि बहूनि बाल्ये । स्वशिक्षणार्थं चितवान् धनानि ।।४।।

तस्य प्रिया कन्दुकदण्डकेलिः । तथा प्रियासीत् पदकन्दुकस्य ।।
स नाटकेभ्यः स्पृहयाञ्चकार । भूतादरः सोऽपि नटेषु नित्यम् ।।५।।

हृच्छस्त्रकार्यं पणशीकराणाम् । मूल्यं विना तेन कृतं वरेण्यम् ।।
स बद्धभावः प्रति नाट्यसृष्टिम् । निन्ये स्वयानेन नटाननेकान् ।।६।।

पस्पर्श नासौ मदिरां कदापि । जघास मांसं न गृहे बहिर्वा ।।
नीतुर्न जज्ञे खलधूम्रपानम् । व्यायाममेषोऽप्यपरं चकार ।।७।।

निर्मातुमैच्छत् भवनं विशालम् । मुम्बापुरेऽसौ हृदि पीडितेभ्यः ।।
अभीप्सितार्थं स्वधनं प्रदाय । स लब्धवान् भूरि धनं जनेभ्यः ।।८।।

नीतूवरेण्यो घनराष्ट्रभक्तः । प्राप्तुं प्रशिक्षां प्रययौ विदेशम् ।।
विदेशवासे ववृधेऽस्य विद्या । तथापि नायं लुलुभे धनाय ।।९।।

अमेरिकास्थां धनदां सुसेवाम् । त्यक्त्वा निवृत्तो निजमातृभूमिम् ।।
साहाय्यवित्तं स चिचाय भूरि । शल्यक्रियार्थं नतनिर्धनानाम् ।।१०।।

हृच्छल्यशास्त्रस्य विकासतन्त्रम् । स आनिनाय प्रथमं विदेशात् ।।
अध्यापयामास चिकित्सकां तद् । नवप्रकारं प्रगतक्रियायाः ।।११।।

हृद्रोपणार्थेऽपयशो न जज्ञे । शीघ्रोपचारार्थमसौ दधाव ।।
कदापि नासीत् स धनानुगामी । तस्यानुगामि स्वयमेव वित्तम् ।।१२।।

स लीलयाऽपावृतशस्त्रकर्म । हृदामकार्षीत् मरणोन्मुखानाम् ।।
शस्त्रक्रियान्ते स बभाण बन्धून् । अहो कृपैषा परमेश्वरस्य ।।१३।।

शिशोः परिष्वङ्गसुखे रतां स्त्रीम् । हृद्रोगमुक्तं च शिशुं हसन्तम् ।।
दृष्ट्वास्य चेतो मुमुदे नितान्तम् । उपेत्य बालं स जहास मन्दम् ।।१४।।

हृच्छस्त्रकर्माणि चकार भूरि । विश्वस्य देवे परमं सभावम् ।।
शल्योपचारान् सफलीभवन्तः । हृद्रोगमुक्ताः प्रणमन्ति नीतुम् ।।१५।।

विक्रान्तनौकापरिरक्षणार्थम् । कृतप्रयत्नोऽर्जितवान् यशोऽसौ ।।
स वैद्यशास्त्रे कृतवृद्धिकार्यात् । लेभे प्रशस्तीर्बहुधा समानम् ।।१६।।

चिकित्सकोऽयं बहुलब्धकीर्तिः चिकित्सकोऽयं कृतनेत्रदानः ।।
दरिद्रसेवाव्रतमाददे सः । स्वदेशसेवाव्रतमाददे सः ।।१७।।

आसीत्स राजा हृदयस्य नूनम् । आसीत्स राजा हृदि पीडितानाम् ।।
आसीत्स राजा च चिकित्सकानाम् ।आसीत्स राजा परिचारिकाणाम्।।१८।।

सपादलक्षान्तिकशस्त्रकर्म । प्रायः स चक्रे लघुजीवनेऽस्य ।।
आक्रम्य सिन्धून् प्रसृतास्य कीर्तिः। नीतुः समोऽन्यो भविता न वैद्यः।।१९।।

दिवङ्गतोऽसौ हृदयाक्रमेण । विहाय सर्वानतिदुःखसिन्धौ ।।
मित्राणि सख्यो सुबहूनि चासन् । तस्मिन् गते ते रुरुदुर्नितान्तम् ।।२०।।

नीतूवर त्वां नहि विस्मरामि । आगच्छ भूमिं त्रिदिवाद् द्रुतं त्वम् ।।
सम्प्रार्थयेऽहं मम देवमेवम् । तस्मै प्रभो देहि पुनर्नृदेहम् ।।२१।।

अनुवाद- (७. हृदयराजगौरवम् )

(जगप्रसिद्ध हृद्शल्य विशारद चिकित्सकश्रेष्ठ डॉ. नीतू मांडके यांचे दि.२०/५/२००३ रोजी वयाच्या ५४व्या वर्षी अकाली हृद्गति बंद पडून निधन झाले.

त्यांच्या स्मृतीस माझी ही काव्यकुसुमांजलि)

मांडके यांच्या प्रसिद्ध वंशात जन्मलेल्या जगप्रसिद्ध शल्य विशारद असलेल्या डॉ.नीतू मांडके यांना कोण बरे ओळखत नाही? ।।१।।

तीव्र हार्ट ॲटॅकने होणाऱ्या मृत्यूपासून त्यांनी बऱ्याच रोग्यांना वाचविले. परंतु स्वत:चे निधन मात्र अत्यंत जोराच्या हार्ट ॲटॅकने झाले. त्यांची स्वर्गात जरुरी होती काय? काय सांगावे! दैवगतीच विचित्र आहे. ।।२।।

अहो, ते काही स्वर्गवासी झालेच नाहीत. आपल्या हृदयाचे दान करण्यासाठी ते स्वर्गात गेले आहेत किंवा ते स्वर्गवासी झालेल्यांची हृदये तपासण्यासाठी तर तेथे गेले असतील का? ।।३।।

दिवाळी येताच ते त्यांच्या बालपणात आकाशकंदील, उटणे वगैरे वस्तू विकून स्वत:चे शिक्षणासाठी पैसे जमवीत असत. ।।४।।

त्यांचा हॉकी हा आवडता खेळ होता. तसेच फुटबॉलही त्यांना आवडत असे. त्यांना नाटके आवडत असत. तसेच त्यांना नटांबद्दल खूप आदर असे. ।।५।।

मा.प्रभाकर पणशीकरांची हृदयशस्त्रक्रिया त्यांनी विनामूल्य केली. नाट्यसृष्टी बद्दल त्यांना जिव्हाळा होता. स्वत:च्या गाडीने ते अनेक नटांना नेत असत. ।।६।।

ते दारुला कधीही शिवले नाहीत. तसेच त्यांनी घरी किंवा बाहेर कधीही मांस भक्षिले नाही. ते घातक अशा धूम्रपानापासून दूर होते. शिवाय ते व्यायामही करीत असत. ।।७।।

हृदय रोग्यांसाठी मुंबईमध्ये एक विशाल हॉस्पिटल बांधण्याची त्यांची इच्छा होती. त्यांच्या या इच्छित कार्यासाठी त्यांनी स्वत:चा पैसा दिलाच. परंतु लोकांकडूनही खूप पैसा मिळविला. ।।८।।

नीतू मांडके हे प्रखर राष्ट्रभक्त होते. पुढील शिक्षणासाठी ते विदेशात गेले. परदेशात त्यांच्या विद्येत खूप वाढ झाली. परंतु त्यांना पैशांचा कधीही मोह झाला नाही. ।।९।।

खूप पैसा देणारी अमेरिकेतील नोकरी त्यांनी सोडली व आपल्या मायभूमीत परतले. गरीब गरजूंच्या शस्त्रक्रियेसाठी त्यांनी बराच पैसा जमविला. ।।१०।।

हृदय शस्त्रक्रियेचे नवीन 'मिकास' तंत्र त्यांनी परदेशातून प्रथमच भारतात आणले. त्या नवीन शस्त्रक्रियेचे शिक्षण त्यांनी बऱ्याच डॉक्टरांना दिले. ।।११।।

हृदयरोपणात त्यांना अपयश कधीही माहिती नव्हते. तातडीच्या उपचारांसाठी ते धावून जात. ते पैशाच्या मागे कधीही नव्हते. उलट पैसाच त्यांचे मागे होता.।।१२।।

अत्यंत मरणावस्थेतील रुग्णांची ओपनहार्ट सर्जरी ते सहजपणे करीत असत. शस्त्रक्रिया झाल्यावर ते (रुग्णाच्या) नातेवाईकांना सांगत ''अहो, ही तर परमेश्वराची कृपा!'' ।।१३।।

शस्त्रक्रियेमुळे हृदयरोगमुक्त झालेल्या हसऱ्या बालकास तसेच आपल्या शरीरावर बालकाचे बागडण्याचे सुख अनुभवणाऱ्या स्त्रीस(आईस) पाहून त्यांना अत्यंत आनंद होत असे. अशा बालकाजवळ जाऊन ते मन्द हास्य करीत असत. ।।१४।।

देवावर नितांत श्रद्धा ठेवून त्यांनी खूप शस्त्रक्रिया केल्या. शस्त्रक्रिया सफल झालेले हृदयरोगमुक्त नीतूंपुढे नतमस्तक होतात. ।।१५।।

विक्रांत नौकेचे रक्षण करण्यासाठी त्यांनी खूप प्रयत्न केले व त्यात त्यांना चांगले यश मिळाले. वैद्यकीय शास्त्रात त्यांनी जी वाढ केली त्याबद्दल त्यांना अनेक बहुमान प्राप्त झाले. ।।१६।।

ते खूप कीर्ती मिळविलेले डॉक्टर होते. ते नेत्रदान केलेले डॉक्टर होते. त्यांनी दीन दरिद्री लोकसेवेचे व्रत स्वीकारले होते. त्यांनी देशसेवाव्रत स्वीकारले होते.।।१७।।

ते खरोखर हृदयाचा राजा होते. ते हृदयरोग्यांचा राजा होते. ते डॉक्टरांचा राजा होते व परिचारिकांचाही राजा होते. ।।१८।।

त्यांनी आपल्या अल्पजीवनात बहुधा पाव लक्षापर्यंत शस्त्रक्रिया केल्या आहेत. सागरांच्या सीमापार त्यांची कीर्ती पसरली आहे. नीतूंसारखा दुसरा डॉक्टर होणार नाही.।।१९।।

सर्वांनाच दु:खसागरात सोडून ते हार्ट ॲटॅकने गेले. त्यांना मित्र आणि मैत्रिणी पुष्कळ होत्या. ते जाताच ते ढसाढसा रडले. ।।२०।।

हे नीतूश्रेष्ठा, तुला मी कधीही विसरणार नाही. स्वर्गातून तू लवकरच पृथ्वीवर ये. माझ्या देवास मी प्रार्थना करतो, हे प्रभो, तू त्यांना पुन्हा नरदेहात पुनर्जन्म दे.।।२१।।

# ८. दोलागृहम् ।

(उपजातिवृत्तम्)

दोलागृहे मां न निधाय गच्छ । कार्यालयं त्वं मम मातृदेवि ।।
नाहं चिकीर्षामि गृहं विहातुम् । मां स्नापयन्तीं स्वपितामहीं च ।।१।।

त्वया विनाहं हि कथं लभेयं । दुग्धं त्वदीयं खलु चिन्तयस्व ।।
विहाय पीयूषरसं पिबामि । कूपीस्थदुग्धं हि बलेन दत्तम् ।।२।।

कथं सहिष्ये विरहं त्वदीयम् । कथं वदेयं मम पीडनं त्वाम् ।।
उपास्य कट्यां तव दृश्यते खे । सूर्योदयोऽम्ब प्रतिभानुवारम् ।।३।।

उन्नीय हस्तं कुरुषे स्मितं त्वम् । कार्यालयार्थं नु यदा प्रयासि ।।
तदाननं शुष्यति मे सदुःखम् । अश्रूणि भूम्यां च मुहुः पतन्ति ।।४।।

शिशोःपरिष्वङ्गसुखं विनान्यद् । न स्यात् पवित्रं खलु भूतलेऽस्मिन् ।।
कथं न जानासि मनोव्यथां मे । द्रव्यार्जनार्थं यतसे कियत् त्वम् ।।५।।

विराममश्नुष्व षडष्टमासान् । सङ्गोपनार्थं गृह एव मातः ।।
न रोचते मे वलये करस्थे । कण्ठस्थमालां नु सुवर्णवर्णाम् ।।६।।

श्रुत्वा विलापं नु ममातिदूरात् । अत्रस्थनारी शिशुपालयित्री ।।
न सान्त्वयन्ती कुपिता तु मह्यं । चपेटिकां सा सबलं ददाति ।।७।।

मद्रक्षणे या ललना नियुक्ता । सा सर्वदा पश्यति चित्रवाणीम् ।।
प्रीणाति सा त्वां मृदुभाषणेन । स्तवीति सा मां वितथं तवाग्रे ।।८।।

विश्रम्य विश्रम्य पुनश्शयेऽहम् । स्मृतिस्तव त्रासयते दिवा माम् ।
आगत्य मातर्धर मां कराभ्याम् । निद्रायमाणाय च गाय गीतम् ।।९।।

**त्वय्यागतायां मुदितो भवामि । अङ्कं समारुह्य पिबामि दुग्धम् ।।**
**दुग्धं न तत् किन्तु सुधानिधानम् । सर्वेश्वरो निर्मितवान् मदर्थम् ।।१०।।**

**किं मन्यसे त्वं मम दर्शनेन । किं मन्यसे त्वं मम भाषणेन ।।**
**किं मन्यसे त्वं मम चुम्बनेन । किं मन्यसे त्वं मम रोदनेन ।।११।।**

**दन्तोद्गमो मे भविताऽचिरेण । ज्ञास्यामि पश्चादनुरिङ्गणं च ।।**
**विसूचिकादिप्रतिरोधकानि । प्राश्यौषधानि क्रमशोऽपि लप्स्ये ।।१२।।**

**वर्षद्वयानन्तरपुष्टकायः । मृन्मूर्तिमेकां सुवरां करिष्ये ।।**
**कृत्वा विमानोड्डयनं सवेगम् । नभोऽङ्गणेऽहं बहु खेलितास्मि ।।१३।।**

**एतन्न जानीहि कदापि मातः । असम्भवं मे गगने प्रयाणम् ।।**
**तवोदरस्थः श्रुतवानहं तां । विस्फोटमालां मरुभूमिभूताम् ।।१४।।**

**प्रक्षिप्य वृक्षेषु शिलाप्रखण्डान् । आम्राण्यनेकान्यवपातयिष्ये ।।**
**चित्वाऽवसन्नानि फलानि भूम्याम् । प्रस्थापयिष्ये तव सम्मुखेऽहम् ।।१५।।**

**परिक्रमन्ते पशुपक्षिणोऽपि । दिनान्त्ययामे स्वगृहं विशन्ति ।।**
**अहं परं पञ्जरबद्धकीरः । वरं प्रसूतिर्विटपस्थनीडे ।।१६।।**

**जानामि किं नैव च सत्यमेतद् । वासांसि तेऽहं मलिनीकरोमि ।।**
**अवेहि बाल्यं मम, किं करिष्ये । दास्यामि तुभ्यं सुसुखं भविष्ये ।।१७।।**

**काङ्क्षे च नाहं शशिनं नभस्थम् । महार्घवस्त्राण्यपि नैव काङ्क्षे ।।**
**इच्छामि नाहं द्रविणं धनं वा । काङ्क्षे तु दुग्धं हि तवैव मातः ।।१८।।**

अनुवाद- (८. दोलागृहम् )(पाळणाघर)

आई गं, मला पाळणाघरात ठेवून तू नोकरीस जाऊ नकोस. मला न्हाऊ घालणाऱ्या आजीस व घरास मी सोडू इच्छित नाही गं ! ।।१।।

खरंच, तू विचार कर, तुझ्यावाचून मला तुझे दूध मिळेल कां? अमृतपान सोडून मला बळेच दिलेले बाटलीतील दूध प्यावे लागते. ।।२।।

सांग, तुझा विरह मी कसा सहन करु? तुला माझे दु:ख कसे सांगू? दर रविवारीच तुझ्या कडेवर बसून मला सूर्योदय पाहता येतो गं ! ।।३।।

कामावर जाण्यासाठी तू जेव्हा निघतेस तेव्हा हसतमुखाने तू माझ्याकडे पाहून हात उंचावतेस. त्यावेळी माझा चेहरा दु:खाने सुकून जातो व डोळ्यांतून अश्रूंच्या धारा जमिनीवर वारंवार पडत रहातात. ।।४।।

लहान बाळाच्या आलिंगन सुखाव्यतिरिक्त या भूतलावर दुसरे कोणतेही पवित्र सुख नसेल. माझी ही मनोव्यथा तुला कशी समजत नाही? पैशासाठी तू किती धडपडतेस?।।५।।

माझा सांभाळ घरीच करण्यासाठी तू सहा-आठ महिन्यांची रजा घे. माझ्या दोन्ही हातातील कडी तसेच गळ्यातील सोनेरी माळसुद्धा मला आवडत नाही गं! ।।६।।

दुरुनच माझे रडणे ऐकून मुलांना सांभाळणारी येथील बाई मला शांत न करता उलट माझ्यावर रागावते व माझ्या (गालात) जोरात चापट देते. ।।७।।

माझी काळजी घेणारी येथील बाई नेहमीच दूरदर्शन पाहण्यात गर्क असते. ती गोड बोलून तुला खूष करते व तुझ्यापुढे माझी खोटी स्तुती करते. ।।८।।

थांबून थांबून मी पुन्हा पुन्हा पडतो. तुझी आठवण मला दिवसा सारखी छळत्ये गं! आई गं, तू येऊन मला तुझ्या बाहूत घे व अंगाई गीताने झोपव. ।।९।।

तू घरी येताच मला आनंद होतो. लगेच तुझ्या मांडीवर उडी घेवून मी तुझे दूध ढोसू लागतो. अगं, ते दूध नव्हेच, तो तर परमेश्वराने माझ्यासाठी निर्माण केलेला अमृताचा ठेवा आहे. ।।१०।।

सांग मी दिसताच तुला काय वाटते? माझे शब्द ऐकून तुला कसे वाटते? माझा मुका घेतांना तुला कसे वाटते व माझ्या रडण्याने तुला कसे होते? ।।११।।

मला लवकरच दात येतील. नंतर मला हळूहळू रांगताही येईल. रोगप्रतिबंधक औषधांचे डोस क्रमाक्रमाने मला मिळतील. ।।१२।।

दोन वर्षांनी सुदृढ झाल्यावर मी एक सुरेख मातीचे चित्र बनवीन. अतिशय

वेगाने विमानाने मी उड्डाण करुन नभांगणात भरपूर खेळेन. ।।१३।।

अगं आई, तू असं समजू नकोस की माझी आकाशातील भरारी अशक्य आहे. अगं, तुझ्या गर्भात असतांना मी वाळवंटात झालेले (पोखरण) स्फोट ऐकले आहेत.।।१४।।

आंब्यांनी भरलेल्या झाडांवर दगड फेकून मी खूप आंबे खाली पाडीन. जमिनीवर पडलेले आंबे गोळा करुन मी ते तुझ्या पुढ्यात ठेवीन. ।।१५।।

पशुपक्षी स्वत:हून फिरत असतात. सायंकाळी ते आपापल्या घरी येतात. मी मात्र पिंजऱ्यातील बंदिस्त पोपट होय. (अहो) यापेक्षा झाडावरील घरट्यात जन्म घेणे बरे. ।।१६।।

मला हे समजत नाही कां, की मी तुझे कपडे खराब करतो. काय करु? अगं माझी बाल्यावस्था लक्षात घे. तुला पुढील आयुष्यात खूप सुखात ठेवीन. ।।१७।।

मला आकाशातील चंद्र नको. उंची कपडेही नकोत. द्रव्य किंवा धन ही नको. मला फक्त तुझे दूधच हवे गं? ।।१८।।

*****

## ९. कुमारमानसम् ।

(उपजातिवृत्तम्)

**आगच्छ मातर् त्वरया गृहं त्वम् उपास्य कट्यां च बहिर्नयस्व ।**
**दिशस्व सूर्यं क्षितिजं प्रयान्तं बलाकमालां गगने भ्रमन्तीम् ।।१।।**

**धेनूश्चरन्ती: परितस्तडागम् वत्सांश्च तासामनुगन्तुकामान् ।**
**प्रक्षालयन्ती: वसनानि नारी: मत्स्यान् धरन्तं पटुधीवरं च ।।२।।**

**मृत्ताम्रभाण्डानि निधाय मूर्ध्नि जलं वहन्तं ललनासमूहम् ।**
**बालान् तरीतुं विशतस्तडागम् तोयं स्वचञ्चा पिबत: कपोतान्।।३।।**

**प्राप्तुं स्वभक्ष्यं मुहुरुत्पतन्ति भेका वराकास्तटमाश्रयन्त: ।**
**कुर्वन्ति रात्रौ शयनं कुतस्ते पङ्के जले वा कथयस्व मात: ।।४।।**

त्यक्तुं विलापं नु मुहुर्ब्रवीषि तथापि हट्टं नयसे न किं माम् ।
मां मन्दिरं नेष्यसि वा कदापि गेहे तदर्थं समयः कुतस्ते ।।५।।

कृत्वाङ्गुलिं मे सुकरे त्वदीये प्रदक्षिणा मे भविता शनैश्च ।
समर्पयिष्ये कुसुमानि मूर्त्यै दूर्वाङ्कुरान् पाटलपुष्पमालाम् ।।६।।

उन्नीय हस्तं मम नादयिष्ये घण्टां स्थितां मन्दिरमध्यभागे ।
संस्थापयिष्ये धनपेटिकायाम् रुप्यात्मकं नाणकमेकमम्ब ।।७।।

मूर्तेः समक्षं पृथुनारिकेरम् भिन्द्यां तथाहं नमनं करिष्ये ।
भाले विभूतिं च विलेपयिष्ये तीर्थं प्रसादं सदयं ग्रहीष्ये ।।८।।

उत्पाटयिष्ये कमलानि भूरि विष्ट्वा तडागं प्रसृतं विशालम् ।
गजेन्द्रमोक्षस्य कथां स्मरामि श्रुतां मया तां मम मातृगर्भे ।।९।।

द्रक्ष्यामि, शीघ्रं प्रपलायमानान् क्षुत्पीडितालीन् मधु लब्धुकामान् ।
क्रोत्स्यन्ति पद्मोत्पटनेन मे ते यास्यन्ति दूरं विफलप्रयासाः ।।१०।।

समाप्य रात्रिर्भविता प्रभातम् हसेत् तडागे कमलं समोदम् ।
विचिन्तिते कोषगते द्विरेफे हा हन्त पद्मं गज उज्जहार ।।११।।

मूढोऽसि रे पङ्कज बद्धभृङ्ग निरर्थकं त्वं म्रियसे किमर्थम् ।
करोषि छिद्रं लगुडे कठोरम् बिभेषि दष्ट्वा कमलं विभेत्तुम्?।।१२।।

इच्छामि चेतुं बदरीफलानि घ्रातुं सुगन्धं नवमञ्जरीणाम् ।
भूमौ विकीर्णानि फलानि चेतुं चिन्ता न मे स्यात्ततकण्टकानाम् ।।१३।।

दिनान्त्ययामे स्वजनान् प्रणम्य श्रीरामरक्षापठनं करिष्ये ।
अन्त्याक्षरैः संस्कृतभाषितेषु मध्येकुटुम्बं च विनोदयिष्ये ।।१४।।

**यास्यामि नित्यं शिशुपाठशालाम् धृत्वा करे पुस्तकपेशिकां मे ।**
**न पीडयिष्ये स्वगुरून् कदापि तेषामनुज्ञामनुपालयिष्ये ।।१५।।**

**स्वाधीनताप्राप्तिदिने प्रभाते प्रभातफेरीति परिक्रमायाम् ।**
**ध्वजं त्रिवर्णं स्वकरे गृहीत्वा उद्घोषयिष्ये मम राष्ट्रगीतम् ।।१६।।**

**विज्ञानवेत्ता भवितुं भविष्ये खगोलशास्त्राध्ययनं करिष्ये ।**
**गत्वान्तरालं यदि लोपयिष्ये भाग्यं च मे सेत्स्यति चावलावत् ।।१७।।**

**जानामि यन्मे जननी जनिर्भूर् गरीयसी स्वर्गसुखादपीयम् ।**
**क्षयेद्वपुर्मे निजमातृभूम्यै पतेद्वपुर्मे निजमातृभूम्यै ।।१८।।**

अनुवाद- (९. कुमारमानसम् )

आई, तू लवकर घरी ये गं, मला कडेवर बसवून बाहेर ने. मावळणारा सूर्य, आकाशात फिरणारी बगळ्यांची माळ मला बघू दे. ।।१।।

तसेच तळ्याभोवती भटकणाऱ्या गाई व त्यांच्या पाठोपाठ असणारी त्यांची वासरे, भांडी घासणाऱ्या स्त्रिया व मासे धरणारे चतुर कोळी मला पाहू दे ना! ।।२।।

तसेच मातीची, तांब्याची भांडी डोक्यावर घेऊन पाणी वाहणारा स्त्रियांचा समूह, पोहण्यासाठी तळ्यात शिरणारी मुले व आपल्या चोचीने पाणी पिणारी कबुतरे ही सर्व मला पाहू दे ना गं ! ।।३।।

स्वत:चे खाद्य मिळविण्यासाठी वारंवार उड्या घेणारे व तटावर आश्रय घेणारे बिचारे बेडूक ! आई हे बेडूक रात्री झोपतात कोठे गं? चिखलात की पाण्यात, सांग ना! ।।४।।

रडणे थांबव, असे तू मला सारखी सांगतेस. पण मग मला बाजारात का नेत नाहीस? मला केव्हातरी देवळात नेशील कां? पण तुला वेळ कसा असणार? ।।५।।

देवळात तुझ्या हातात माझे बोट देऊन मी हळूहळू प्रदक्षिणा करीन. मूर्तीला मी फुले वाहीन. दूर्वा तसेच जास्वंदीच्या फुलांची माळ ही घालीन. ।।६।।

हात उंचावून मंदिराचे मध्यभागात असलेली घंटा मी वाजवीन. दानपेटीत मी

एक रुपयाचे नाणेही टाकीन. ।।७।।

मूर्तीसमोर मी एक मोठा नारळ फोडीन व मूर्तीला नमस्कार करीन. कपाळावर भस्म लावून, श्रद्धेने तीर्थ व प्रसाद घेईन. ।।८।।

विस्तृत पसरलेल्या तलावात शिरुन मी खूप कमळे उपटीन. गर्भावस्थेत आईच्या उदरात असतांना ऐकलेली गजेंद्रमोक्षाची कथा मला आता आठवते. ।।९।।

मधाचे शोधात असणारे, भुकेने व्याकूळ झालेले व घाईने पळणारे भुंगे मला पहाण्यास मिळतील. कमळे उपटण्यामुळे ते रागावतील व आपले प्रयत्न विफल झालेले ते भुंगे दूरवर निघून जातील. ।।१०।।

रात्र संपून सकाळ होईल व तळ्यातील कमळ फुलेल असा विचार कमळाच्या कळीत अडकलेल्या भुंग्याच्या मनात येतो तोच अरेरे इतक्यात हत्ती येऊन ते कमळच उपटतो. ।।११।।

अरे कमळात अडकून बसलेल्या भुंग्या तू खरंच मूर्ख आहेस. तू विनाकारण का मरु इच्छितोस? तू जर कठीण लाकडाला सुद्धा भोक पाडतोस, मग या यःकश्चित कमळाचा चावून भेद करण्यास घाबरतोस काय? ।।१२।।

बोरीखाली पडलेली बोरे मला गोळा करावयाची आहेत. तसेच झाडांच्या नुकत्याच बाहेर पडलेल्या मोहोराचा सुगंध मला घ्यावयाचा आहे. बोरीखालची बोरे गोळा करतांना पसरलेल्या काट्यांची मला मुळीच चिंता नसेल. ।।१३।।

सायंकाळी घरच्यांना नमस्कार करुन रामरक्षा म्हणेन. घरातील कुटुंबियांच्याबरोबर संस्कृत सुभाषितांच्या भेंड्या खेळून करमणूक करीन. ।।१४।।

पुस्तकांची पिशवी हातात घेऊन मी रोज शिशुमंदिरात जाईन. माझ्या गुरुजनांना मी कधीही त्रास देणार नाही. त्यांच्या आज्ञेचे पालन करीन. ।।१५।।

भारताच्या स्वातंत्र्यदिनी सकाळी प्रभातफेरीत हातात तिरंगा घेऊन मी आपले राष्ट्रगीत म्हणेन. ।।१६।।

भावी आयुष्यात विज्ञानाचा जाणकार होण्यासाठी मी खगोलशास्त्राचा अभ्यास करीन. अंतराळयात्री असताना जर मी (दुर्दैवाने) आकाशात नाहीसा झालो तर मी ते कल्पना चावलाप्रमाणे माझे भाग्य समजेन. ।।१७।।

मी हे जाणतो की, माझी आई व जन्मभूमी स्वर्गाहूनही श्रेष्ठ आहेत. माझ्या मातृभूमीसाठी माझा देह झिजो व तिच्यासाठीच तो पडो. ।।१८।।

*****

# १०. समाजदीपिकागौरवम् ।

(उपजातिवृत्तम्)

(कर्जतस्थिता: प्रसिद्धा: संस्कृतप्रचारिका: शिशून् संस्कारयन्त्य: समाजसेविका: श्री.सुलभा वसन्त जोगलेकर, महोदया: ७२ वयोवर्षे २५/७/२००४ दिनाङ्के हृद्गतिरोधेन त्रिदिवं गता: । तासां स्मृत्यै ममाल्पीयान् काव्यकुसुमाञ्जलिरयं समर्प्यते ।)

**जानन्ति सर्वे विदुषीं प्रसिद्धाम् । पुरे चिरं कर्जतनाम्नि तस्थौ ।।**
**या संस्कृते लब्धवती प्रशिक्षाम् । वऱ्हाडदेशे निजशैशवादा ।।१।।**

**जोग्लेकराणां सुकुलं प्रविष्टाम् । सानेकुले लब्धजनुं प्रसिद्धे ।।**
**वसन्तभार्यां सुलभावरेण्याम् । सदाशिवोऽहं मनसा स्मरामि ।।२।।**

**प्रचारिका सा प्रथमा पुरेऽस्मिन् । या संस्कृतार्थं नितरां प्रयेते ।।**
**सभाजनात् सा ववृते सुदूरम् । इयेष नासावपि मानवित्तम् ।।३।।**

**सा मध्यमूर्तिः सततं प्रसन्ना । मञ्चे सभायां विबभौ सदैवम् ।।**
**तामाह्वयन्ति स्म जनाः समानम् । मुख्यातिथित्वेन सभासु वक्तुम् ।।४।।**

**अध्यापिका सा बहुलब्धकीर्तिः । चाटेप्रवर्गे प्रियसंस्कृतस्य ।।**
**लिलेख सा संस्कृतपुस्तकानि । त्रीणि स्वहस्ताक्षरलेखनेन ।।५।।**

**पूर्वं तथा चोत्तरमेघदूतम् । सा चित्रवाण्यां विततं चचर्च ।।**
**गुञ्जारवे सा विलिलेख पूर्वम् । आवाहनं नाम सुरम्यकाव्यम् ।।६।।**

**सा दासबोधश्रवणोत्सुकानाम् । संस्थापयामास समूहमेकम् ।।**
**स्तोत्राण्यनेकानि च शिक्षयित्वा । सा निर्ममे तेषु रुचिं नितान्तम् ।।७।।**

सा दासबोधाध्ययनं निनाय । गृहाणि पत्रालयमाध्यमेन ।।
त्रिवर्षकालाभ्यसनेन नार्यः । प्रमाणपत्राण्यलभन्त नाम्ना ।।८।।

लेखान् बहून् सा विलिलेख रम्यान् । त्रैमासपत्रेषु च मासिकेषु ।।
सा शिक्षयामास दृढं स्वशिष्यान् । ये प्राप्तवन्तः सुलभं यशोऽन्ते ।।९।।

महामनाः सा ललना स्वभावात् । या संस्कृतार्थं क्षयति स्म देहम् ।।
गुणाधिकत्वाद्विबभुः प्रवीणाः। सर्वासु कक्षासु सदा स्वशिष्याः।।१०।।

जग्राह शुल्कं न कदापि कस्मात् । न मानवित्तं जगृहे तथैव ।।
सा पालयामास गुरूपदेशान् । ज्ञानाय विद्या न धनार्जनाय ।। ११।।

सख्यस्तदीया रचयाम्बभूवुः । ग्रन्थं सुरम्यं दृढनिश्चयेन ।।
सहायतां सा प्रददौ सखीभ्यः । चर्चाक्रियायां कृतबोधनेन ।।१२।।

स्पर्धापरीक्षासु परीक्षणार्थम् । आसीन्नियुक्ता बहुधा समानम् ।।
निबन्धलेखप्रतियोगितासु । उच्चारणे श्लोकसुभाषितेषु ।।१३।।

सा गीतरामायणलब्धकीर्तिः प्रबोधयामास जनाननेकान् ।।
स्वभाषणेभ्यः कृतवेदिकाभ्यः। सभासु शालासु महोत्सवेषु ।।१४।।

सा वाचयामास पुराणवेदान् । श्रीमन्महाभागवतं शुकानाम् ।।
सा संहिताऽर्थं कथयाञ्चकार। विस्तारपूर्वं पुरतो बुधानाम् ।।१५।।

सा सेविकाऽऽसीत् घनदेशभक्ता । तथा समित्या नियता सदस्या ।।
प्राचोदयत् सा युवतीः समर्थाः। रज्ज्वाऽधिरोढुं शिखराणि यत्नैः।।१६।।

स्वातन्त्र्यवीरस्य विनायकस्य । काव्याय साऽपि स्पृहयाञ्चकार ।।
मृत्युस्त्वदर्थं जननं तदेव । जनुर्विना त्वां मरणं तदेव ।।१७।।

तस्याः प्रियं पर्यटनं निसर्गे । प्रभातकाले भ्रमणं पदाभ्याम् ।।
सा दुर्गमारूढवती सधैर्यम् । षट्षष्टिवर्षायुषि राजमाचीम् ।।१८।।

लेभे सुनीलं तनयं सुवृत्तम् । वैज्ञानिकोऽयं ततदूरकीर्तिः ।।
ग्रामेषु शोधान् किल नेतुकामः। स्वर्गं ययौ सोऽपि परं कुभाग्यात्।।१९।।

आषाढमासे गुरुपौर्णिमायाम् । ववन्दिरे शिष्यगणा गृहे ताम् ।।
फलानि पुष्पाणि समर्प्य भक्त्या। प्रापुः शुभाशीर्वचनानि ताभ्यः।।२०।।

सा दर्शयन्ती ललनाः सुमार्गम् । उत्पादयन्ती युवतीषु धैर्यम् ।।
संस्कारयन्ती च शिशून् कथाभिः। निवेशयन्ती हृदये जनानाम् ।।२१।।

राष्ट्राभिमानं हृदि धारयन्ती । भद्रं जनानामपि चिन्तयन्ती ।।
समाजदीपा गरुडध्वजा वा सम्बोधयेत् किं सुलभावरेण्ये? ।।२२।।

दिवं प्रयाता हृदयाक्रमेण । विहाय सर्वानति दुःखसिन्धौ ।।
सख्यः सखायो बहवस्तदीयाः। तस्यां गतायां व्यलपन्नितान्तम् ।।२३।।

अहो मृता नास्ति महोदयाऽसौ । प्रचारकार्याय दिवं प्रविष्टा ।।
समाप्य कार्यं भुवि संस्कृतस्य। उद्घाटनार्थं दिवि भव्यवर्गम् ।।२४।।

प्राप्तुं प्रशिक्षां दिवि देववाण्याः। जगाम सा वा त्रिदिवं सहेतुः ।।
वेदस्थितं ज्ञानमसौ विदित्वा। विज्ञानगूढं वसुधां प्रहेतुम् ।।२५।।

सेवां जनानामधिकेन कर्तुम् । विस्तारणार्थं समितेः सुकार्यम् ।।
सम्प्रार्थयेऽहं मम देवमेवम् । तस्यै प्रभो देहि पुनर्नृदेहम् ।।२६।।

अनुवाद- (१०. समाजदीपिकागौरवम् )

(कर्जतमधील प्रसिद्ध संस्कृतप्रचारिका, मुलांवर संस्कार घडविणाऱ्या, समाजसेविका श्रीमती सुलभा वसंत जोगळेकर यांचे दि.२५/७/२००४ रोजी वयाचे ७२व्या वर्षी

हृदयक्रिया बंद पडून निधन झाले. त्यांच्या स्मृतीस माझी लहानशी काव्य कुसुमांजली)

वऱ्हाडात आपल्या बालपणापासून ज्यांना संस्कृतचे शिक्षण मिळत गेले अशा कर्जत नावाच्या शहरात कायम राहिलेल्या, विद्वान स्त्रीस सर्वजण ओळखतात. ।।१।।

प्रसिद्ध अशा सानेकुळात जन्मलेल्या, (लग्नामुळे) जोगळेकरांच्या कुळात प्रवेश केलेल्या, श्री.वसंतराव यांची पत्नी असलेल्या विदुषी सुलभा महोदयांचे मी सदाशिव मनापासून स्मरण करतो. ।।२।।

संस्कृतसाठी भरपूर योगदान दिलेल्या त्या या गावातील पहिल्याच संस्कृत प्रचारिका होत. त्या सत्कारापासून दूर तर होत्याच. परंतु त्यांनी कधीही मानधनाचीही अपेक्षा केली नाही. ।।३।।

सतत प्रसन्न असलेली, मध्यम बांध्याची त्यांची मूर्ती सभातील व्यासपीठावर नजरेत भरत असे. बरेच लोक त्यांना प्रमुख पाहुण्या म्हणून सभांमध्ये भाषणासाठी निमंत्रण देत असत. ।।४।।

चाटे क्लासेसमध्ये आपल्या आवडत्या संस्कृत विषयाच्या त्या खूप नावाजलेल्या शिक्षिका होत्या. त्यांची तीन हस्तलिखित संस्कृत पुस्तके आहेत. ।।५।।

दूरदर्शनवर त्यांचा मेघदूतावरील सविस्तर चर्चेचा कार्यक्रम झाला. त्यांनी पूर्वी ''आवाहनम्'' नावाचे सुंदर संस्कृतकाव्य गुञ्जारव या त्रैमासिकात लिहिले आहे.।।६।।

दासबोध श्रवण करणाऱ्या इच्छूक स्त्रियांचे त्यांनी एक मंडळ स्थापन केले. अनेक स्तोत्रे शिकवून त्यांनी त्यांचे ठिकाणी आवड निर्माण केली. ।।७।।

त्यांनी 'पत्राद्वारे दासबोध' घराघरात पोहोचविला. तीन वर्षाची दासबोध अभ्यासिका पूर्ण केलेल्या स्त्रियांना त्यांच्या नावाने प्रमाणपत्रे देण्यात आली. ।।८।।

त्यांनी त्रैमासिके व मासिके यातून बरेच लिखाण केले. त्यांनी चिकाटीने आपल्या शिष्यवर्गास शिकविले. त्यामुळे शेवटी त्यांना यश मिळणे सोपे गेले. ।।९।।

ज्यांनी संस्कृतसाठी आपला देह झिजविला, त्या स्वभावानेही मोठ्या मनाच्या होत्या. त्यांचे विद्यार्थी सर्व वर्गात अधिक गुण मिळवून चमकले. ।।१०।।

त्यांनी कधीही कोणाकडूनही शिकविण्याचे पैसे घेतले नाहीत. तसेच मानधनही स्वीकारले नाही. विद्या ही ज्ञानवाढीसाठीच आहे. पैसे मिळविण्यासाठी नाही. या त्यांच्या गुरूंच्या उपदेशाचे त्यांनी पालन केले. ।।११।।

त्यांच्या मैत्रिणींनी पक्का निश्चय करुन एक सुंदर ग्रंथ मेघदूत भावानुवाद लिहिला. मेघदूतावरील चर्चेत त्यांनी प्रबोधन करून मैत्रिणींना मदत केली. ।।१२।।

शब्दोच्चारण, श्लोक व सुभाषितांचे भाषांतर, निबंधलेखन इत्यादी योग्यतादर्शक व स्पर्धापरीक्षांसाठी परीक्षक म्हणून त्यांची सन्मानपूर्वक नियुक्ति होत असे. ।।१३।।

त्यांना गीतरामायणाने खूप प्रसिद्ध मिळाली. सभा, शाळा तसेच त्यांनी स्नेहसंमेलनामधील व्यासपीठावरुन केलेल्या भाषणांनी अनेकांचे प्रबोधन केले. ।।१४।।

त्यांनी पुराणे, वेद, शुकमुनींचे भागवत इत्यादी ग्रंथांचे वाचन केले. त्यांनी विद्वानांपुढे संहितेचा अर्थ सविस्तर सांगितला. ।।१५।।

त्या प्रखर राष्ट्रभक्त असून समितीच्या नियमित सदस्या होत्या. योग्य अशा तरुणींना त्यांनी दोराच्या साहाय्याने पर्वतशिखरे चढून जाण्याचे प्रयत्न करण्यासाठी प्रेरणा दिली.।।१६।।

तुजसाठी मरण ते जनन, तुजविण जनन ते मरण हे स्वातंत्र्यवीर सावरकरांचे जगप्रसिद्ध काव्य त्यांना फार आवडत असे. ।।१७।।

निसर्गात भटकणे तसेच प्रात:काळचे पदभ्रमण त्यांच्या फार आवडीचे होते. त्या राजमाची किल्ला वयाच्या ६६व्या वर्षी चढल्या. ।।१८।।

दूरपर्यंत कीर्ती पसरलेला त्यांना सुनील नावाचा सद्गुणी व वैज्ञानिक मुलगा होता. त्याची खेड्याखेड्यातून विज्ञानाचे शोध पोहोचविण्याची इच्छा होती. ।।१९।।

आषाढ महिन्यात गुरुपौर्णिमेला शिष्य त्यांचे घरी भेटून त्यांना वंदन करीत असत. फळे व फुले अर्पण करुन त्यांचे शुभाशिर्वाद घेत असत. ।।२०।।

त्या स्त्रियांना सन्मार्ग दाखविणाऱ्या होत्या. तरुणींच्या ठिकाणी धैर्य उत्पन्न करणाऱ्या होत्या, लहान मुलांना गोष्टी सांगून त्यांचेवर चांगले संस्कार घडविणाऱ्या होत्या.।।२१।।

त्यांचे ठिकाणी प्रखर राष्ट्राभिमान होता. त्या सर्वांचे कल्याण चिंतणाऱ्या होत्या. अहो सुलभाताई, आम्ही तुम्हाला समाजदीप म्हणावे की गरुडध्वज म्हणावे? ।।२२।।

सर्वांना दु:खसागरात लोटून त्यांचे हृदयविकाराने निधन झाले. त्यांना मित्र व मैत्रिणी खूप होत्या. त्यांच्या निधनाची बातमी समजातच ते ढसढसा रडू लागले.।।२३।।

अहो, त्या मृत झाल्या नसून, पृथ्वीवरील संस्कृतचे काम संपवून, प्रचारासाठी व भव्य वर्गाचे उद्‌घाटनासाठी त्या स्वर्गात गेल्या आहेत. ।।२४।।

स्वर्गलोकात संस्कृतचे विशेष शिक्षण प्राप्त करण्यासाठी त्या हेतुपुरस्सर तेथे गेल्या असतील कां? की वेदातील ज्ञान जाणून घेऊन विज्ञानाचे गूढ पृथ्वीवर पाठविण्यासाठी?।।२५।।

लोकांची जास्त सेवा करण्यासाठी, तसेच समितीच्या कामाची वाढ करण्यासाठी त्यांना हे प्रभो, पुन्हा मनुष्यदेहात जन्माला घाल अशी मी प्रभुचरणी प्रार्थना करतो.।।२६।।

*****

## ११. दीपस्तम्भः ।

(उपजातिवृत्तम्)

(कर्जतनिवासिनः श्रीमन्तः रा.द.गडकरी महोदयाः गतजूनमासे द्व्यशीतितमे वर्षे प्रविष्टाः। कुष्ठरोगनिवारणप्रकल्पद्वारा नैकान् पीडितान् भवन्तः रोगादमुञ्चन्। एतादृशे समाजकार्ये सततं निमग्नाः इमे महाभागाः नैकाभिः संस्थाभिः सभाजिताः । कार्याध्यक्षरुपेण भवन्तः बहुभ्यः वर्षेभ्यः अ. ज्ञानमन्दिर प्रशालायां कार्यं कुर्वन्ति । नैकाः संस्थाः संस्थापयन्तः ते द्विवारम् आन्ताराष्ट्रियं पुरस्कारमपि लब्धवन्तः । उत्तरवयस्यपि सधैर्यं सबलं कार्यं कुर्वाणानां महाभागानां चरणकमले मम काव्यसुमनाञ्जलिरयम् ।)

**जानन्ति सर्वेऽत्र नरं प्रसिद्धं । चिरं स्थितं कर्जतनाम्निपुर्याम् ।।**
**दत्तात्रयस्यैष महान् सुपुत्रः । लेभे जनिं रामगणेशवंशे ।।१।।**

**निवारणार्थं ततकुष्ठरोगम् । चकार यत्नान् बहुशंसनीयान् ।।**
**अन्विष्य रुग्णान्नु गृहेगृहे च । ग्रामीणभागेषु वने वनेऽपि ।।२।।**

**अन्वेषणं तेन कृतं सधैर्यम् । श्रद्धां समुत्पाद्य च पीडितेषु ।।**
**प्रारब्धवान् तेषु गृहोपचारान् । निवार्य शङ्काः खलु सप्रमाणम् ।।३।।**

निर्मूलनार्थं कृतभूरियत्नः । महोदयोऽयं सफलीबभूव ।।
राष्ट्रान्तरीयां विविदे प्रशस्तिम् । कुष्ठप्रकल्पार्थमसौ द्विवारम् ।।४।।

विवाहितास्ता मुदिता भवन्ति । लग्नानि यासां विरतानि पूर्वम् ।।
कुष्ठं नशित्वा स मुमोच मार्गम् । परोपकाराय सतां प्रसूतिः ।।५।।

चिकित्सको नाम गिरीशवर्यः । पुणेनगर्यां निवसन् सुदूरम् ।।
भोज्यौषधानि क्रमशः प्रदाय । रुग्णान् सबाष्पान् स चकार भद्रान् ।।६।।

ग्रामे कडावेऽपि तु गौळवाड्याम् । संस्थापिते द्वे नवपाठशाले ।।
यत्नेन तस्यैव विनिर्मितानि । नवानि यानान्यपि रेलमार्गे ।।७।।

अध्यक्षरूपेण विभाति रामः । अ.ज्ञा.प्रशाले बहुपूर्वकालात् ।।
शालान्तसिद्ध्यां गुणवत्प्रपत्रे । छात्राश्च केचित् विबभुः प्रवीणाः ।।८।।

ज्ञानं नु तस्यास्ति विधेर्वरेण्यम् । तथा प्रभुत्वं प्रथिताङ्गलवाण्याम् ।।
वक्ता सहस्रेष्वपि सङ्घनेता । जानन् सभाशास्त्रमपारमेषः ।।९।।

उच्चास्य मूर्तिर्धृतगौरवर्णा । मञ्चे सभायां प्रतिभाति नूनम् ।।
तस्यास्ति भाष्यं विवृतं प्रभावि । ग्राम्येषु विद्वत्सु युवत्सु सत्सु ।।१०।।

स दीपस्तम्भः पथदर्शयन्ना । इच्छन् न कञ्चित् सुपदं स्वयं ना ।।
ददद्बहुभ्यश्च सुबोधनं ना । दानाय लक्ष्मीरिति मन्यमानः ।।११।।

स्वाधीनताया अतिपूर्वकाले । प्रभातफेरीति परिक्रमायाम् ।।
ध्वजं त्रिवर्णं स्वकरे गृहीत्वा । जुघोष वन्दे मम मातरं सः ।।१२।।

तवाधिकारोऽस्ति च कर्मणीति । फलेषु नैवास्ति कदापि विद्धि ।।
गीतानुसारं भवति प्रवृत्तिः । आजीवनं तस्य गृहे बहिर्वा ।।१३।।

**दाता सहिष्णुः शुचिलोकनेता । कदापि गृह्णाति न मानवित्तम् ।।**
**आक्रम्य सिन्धून् प्रसृतास्य कीर्तिः। जितेन्द्रियाणां न वयो न सीमा ।।१४।।**



**सेवां जनानामधिकेन कर्तुम् ।**
**अश्रूणि तेषां विपदि प्रमार्ष्टुम् ।।**
**तस्मै प्रभो देहि सुदीर्घमायुः ।**
**तस्मै प्रभो देहि सुदीर्घमायुः ।।१५।।**

अनुवाद- (११. दीपस्तम्भः )

(कर्जत येथे राहणारे श्री.रा.द.गडकरी यांनी गेल्या जून महिन्यात वयाच्या ८२व्या वर्षात प्रवेश केला. कुष्ठरोग निवारण प्रकल्पाच्या माध्यमातून त्यांनी अनेकांना कुष्ठरोगमुक्त केले. अशा समाजसेवा कार्यात सतत गढून गेलेल्या या महोदयांचा अनेक संस्थांनी सत्कार केला. अनेक वर्षांपासून ते अभिनव ज्ञान मंदिर या शाळेचेअध्यक्षस्थान भूषवीत आहेत. उतारवयातही धैर्याने शक्तीनिशी असे कार्य करणाऱ्या या महान् व्यक्तीच्या चरण कमलावर माझी ही काव्यसुमनांजली.)

कर्जत येथे कायम वास्तव्य असलेल्या, राम गणेश गडकरी यांचे वंशात जन्मलेल्या, दत्तात्रयांचे सुपुत्र असलेल्या श्री.रा.द.गडकरी या प्रसिद्ध व्यक्तीस इकडील सर्व लोक ओळखतात. ।।१।।

खेडोपाड्यातील, जंगल वस्तीतील, घराघरातून कुष्ठरोगी शोधून त्यांनी सर्वत्र पसरलेल्या कुष्ठरोगाचे निवारण करण्यासाठी जे प्रयत्न केले ते खरोखरच प्रशंसनीय आहेत.।।२।।

कुष्ठपीडितांमध्ये श्रद्धा उत्पन्न करुन त्यांनी अत्यंत धैर्याने रोगी शोधून काढले. त्यांनी त्यांच्या सर्व शंकांचे निरसन करुन रोग्यांच्या घरीच त्यांचेवर उपचार सुरु केले.।।३।।

कुष्ठरोगाचे निर्मूलन करण्यात या सत्पुरुषास यश आले. त्यांना त्यांच्या कुष्ठ

प्रकल्पासाठी दोन वेळा आंतरराष्ट्रीय पुरस्कार मिळाले. ।।४।।

कुष्ठरोगामुळे ज्या युवतींची पूर्वी लग्ने रखडली होती त्या आज आनंदी आहेत. त्यांच्या शरीरावरील कुष्ठ नाहीसे करुन त्यांच्या लग्नाचा मार्ग त्यांनी मोकळा केला. अहो, परोपकारासाठीच सत्पुरुषांचा जन्म असतो. ।।५।।

पुण्यासारख्या दूरच्या ठिकाणी राहणाऱ्या श्री.गिरीष आफळे यांनी क्रमाक्रमाने पोटात घेणारी औषधे देवून दु:खी कुष्ठरोग्यांना बरे केले. ।।६।।

गौळवाडी व कडाव या ठिकाणी त्यांनी दोन माध्यमिक शाळांची स्थापना केली. त्यांच्याच प्रयत्नांमुळे काही नवीन रेल्वे गाड्या सुरु झाल्या. ।।७।।

फार पूर्वीपासून श्री.रामभाऊ द.गडकरी, अ.ज्ञा.मंदिर या शाळेत अध्यक्ष म्हणून कार्यरत आहेत. माध्यमिक शालान्त परीक्षेत काही विद्यार्थी गुणवत्ता यादीत चमकले.।।८।।

त्यांना चांगल्या प्रकारे कायद्याचे ज्ञान आहे. तसेच त्यांचे इंग्रजी भाषेवरही प्रभुत्व आहे. ते सभाशास्त्राचे मोठे जाणकार असून हजारांमध्ये एखादेच उत्कृष्ट असावे, असे ते वक्ते आहेत. एखाद्या संघटनेचे नेतृत्व करण्याची त्यांची क्षमता आहे. ।।९।।

त्यांची उंच व गौरवर्णीय मूर्ती सभेतील मंचावर शोभून दिसते. खेड्यांमध्ये, विद्वानांमध्ये अगर युवापिढी पुढे कोठेही असो, त्यांचे भाषण विस्तृत व प्रभावी असते.।।१०।।

ते म्हणजे दीपस्तंभाप्रमाणे लोकांचा मार्गदर्शक पुरुष. कोणत्याही चांगल्या पदाची अभिलाषा न करणारे, अनेकांना बहुमोल सल्ला देणारे व धन हे दानासाठीच आहे असे मानणारे आहेत. ।।११।।

स्वातंत्र्यपूर्व काळात प्रभातफेरीमध्ये हातात तिरंगा फडकवीत ते वंदे मातरम्‌च्या घोषणा देत असत. ।।१२।।

'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन' या भगवद् गीतेतील वचनानुसार, जीवनभर घरी अथवा बाहेर त्यांची वागणूक असते. ।।१३।।

ते अत्यंत पवित्र लोकनेता, दाता व सहनशील आहेत. ते कधीही मानधनही घेत नाहीत. सागरांच्या सीमा पार करुन त्यांची कीर्ती पसरलेली आहे. अहो,

जितेंद्रियांना वय व सीमा नसतेच. ।।१४।।

जनसेवा अधिक करण्यासाठी, संकटकाळी त्यांचे अश्रू पुसण्यासाठी, हे परमेश्वरा त्यांना दीर्घायुष्य दे, त्यांना दीर्घायुष्य दे. ।।१५।।

*****

## १२. अणुतेजः ।

(अनुवादितः) (उपजातिवृत्तम्)

**भोः सैकताः पोखरणस्थखण्डा न ज्ञायते सत्यमिदं भवद्भिः ।**
**कृता भवद्भिर्भरतस्य भूमिः पराक्रमाङ्का सुभगा च सद्यः ।।१।।**

**प्राप्तिस्तु तैलस्य, कणान् मृदित्वा कष्टेन साध्यं नच संशयोऽस्ति ।**
**कणेषु तेष्वेव हि भारतस्य स्त्रोतोऽणुशक्तेरवलोकनीयम् ।।२।।**

**स्फोटान् विषह्योरसि पञ्चसङ्ख्यान् सोढो भवद्भिर्धरणीविकम्पः ।**
**धन्या भवन्तः सिकताकणा यैर्विस्मापितं विश्वमिदं विशालम् ।।३।।**

**भोः शास्त्रविज्ञा अपि तन्त्रविज्ञाः परम्परास्माकमतीव भव्या ।**
**कदापि नो विस्मरणीयमेव ग्राह्यस्तु बोधः सततं यथार्थः ।।४।।**

**सुखं च दुःखं च समं विचार्यं जयाजयो लाभ इहाप्यलाभः ।**
**अप्यर्थबन्धाः सदृशा मृदैते न जातु रुन्धन्ति विकासकार्यम् ।।५।।**

**सम्पत्तिकाले च विपत्तिकाले राष्ट्रस्य साध्या प्रगतिः सदैव ।**
**मनस्विभिर्नित्यमयं प्रफुल्लो विराजते भारतवर्षदेशः ।।६।।**

(१२. अणुतेज ) (कवि सु.रा.वैशंपायन, कर्जत - रायगड)

पोखरणातील वाळू कणांनो तुम्हा सत्य हे ज्ञात नसे
भाग्यविधाते तुम्ही आहा या पराक्रमी भारतभूचे
कण रगडूनी तेल काढणे कष्ट साध्य हे जरी असे
भरतभूमीच्या त्याच कणांतून अणुऊर्जेचा स्त्रोत दिसे

स्फोट पंच ते झेलुनी छाती  कंप सोशिला धरणीचा
वाळूकणांनो धन्य जाहला  दिपवुनी टाकीत जगताला
शास्त्रज्ञांनो ! तंत्रज्ञांनो !!  महान आपुली परंपरा
तुम्हा विसरणे शक्य नसे ते  बोध घ्यायचा हाच खरा
सुख-दु:खाते, समान मानुनी  लाभ-अलाभा, जय-अजया
अर्थबंधने, ढेकूळ असती  रोखु न शकती प्रगतीला
आपत्ती अन् विपत्तीतही  सदैव साधी प्रगतीला
भारत आपुला देश असे हा  मानी मनाने फुललेला ।।

***

## १३. मण्डलीक गौरवम् ।

(उपजातिवृत्तम्)

**आसीत् पुरैकः श्रुतपत्रकारः । विद्वद्वरेण्यो बुधरामचन्द्रः ।।**
**जातः सुवंशे शुचिमण्डलीके । प्रसिद्ध आसीत् खलु पेणपुर्याम् ।।१।।**

**आप्त्वा च बाल्याद्धि पितुः प्रशिक्षाम् । बभूव रामः पटुपत्रकारः ।।**
**निर्भीतवक्ता शुचिलोकनेता । समाजकार्ये व्ययितं स्वकालम् ।।२।।**

**तस्यास्ति निष्ठा बुधलोकमान्ये । स्वदेशभक्तः टिळकानुयायी ।।**
**अभीतवाण्यां वचनानि तस्य । आसन् सदैवं नु सभासु लोके ।।३।।**

**आसीत् विधिज्ञः ननु रामचन्द्रः । विराजितोऽसौ निजखादिवेषे ।।**
**आसीत् च तस्मिन् घनराष्ट्रनिष्ठाम् । चकार कार्याणि भयं विनासौ ।।४।।**

**जपानदेशे कृतवान् प्रयाणम् । शस्त्राण्यवाप्तुं द्रविणं तथैव ।।**
**जपानदेशात् विनिवृत्य तेन । क्षेत्रं प्रविष्टं खलु वृत्तपत्रे ।।५।।**

**स्वातन्त्र्यवीरैः सह छात्र आसीत् । स आङ्गलसत्तां विरुरोध तीव्रम् ।।**
**सैन्यप्रवेशं कथयाम्बभूव । विनायकेनोक्तमिदं युवभ्यः ।।६।।**

**आङ्ग्लान् विरुद्धं विलिलेख वृत्तम् । वृत्तेन लेभे कटुबन्दिवासम् ।।**
**यत्नेन तस्यैव हि दण्डितोऽसौ । काप्रेकराणां किल घातकोऽरिः ।।७।।**

**न तेन सोढं यवनानुकूल्यम् । हिन्दूविरुद्धं खलराजनीतिम् ।।**
**ददौ जनेभ्यः प्रतिकारशक्तिम् । सम्मिल्य हिन्दून् प्रबलीचकार ।।८।।**

**महात्मनः राष्ट्रपितुर्वधाय । बन्दीकृतो वीरविनायको वै ।।**
**साहाय्यतां स प्रददौ तदानीम् । वधाभियोगे विनायकाय ।।९।।**

**गान्धीवधानन्तररुष्टलोकाः । गृहाणि केषामदहन् मिलित्वा ।।**
**गृहेषु वस्तून्यपि ते लुलोटुः । शिरस्सु शुक्लाम्बरधारकाज्ञा ।।१०।।**

**प्रश्नानुपस्थाय विधानकक्षे । न्यायः प्रदत्तः खलपीडितेभ्यः ।**
**समाप्य कार्यं च दिवं गतोऽसौ । मूर्तिं नु तस्याद्य नमस्करोमि ।।११।।**

अनुवाद- (१३. मण्डलीक गौरवम् )

पेण शहरातील प्रसिद्ध अशा मंडलीक घराण्यात रामचंद्र नावाचे प्रसन्नमुख विद्वान पत्रकार पूर्वी होऊन गेले. ।।१।।

रामभाऊंना लहानपणीच वडिलांकडून पत्रकारितेचे शिक्षण मिळाल्यामुळे ते कुशल पत्रकार होऊ शकले. निर्भीड वक्तव्य करणाऱ्या शुद्ध चारित्र्याच्या या लोकनेत्याने आपला सर्व वेळ समाजकार्यासाठी खर्च केला. ।।२।।

विद्वान अशा लोकमान्य टिळकांचे ठिकाणी त्यांची निष्ठा होती. जाहीर सभेतील त्यांची भाषणे अत्यंत निर्भीड अशी असत. ।।३।।

खादी वेषातील रामभाऊ हे प्रख्यात वकील होते. त्यांचे ठिकाणी प्रखर राष्ट्रनिष्ठा असून ते सर्व कामे निर्भयतेने करीत असत. ।।४।।

जपान मधील भारतीयांकडून शस्त्रे व धन मिळविण्याचे हेतूने त्यांनी जपानचा दौरा केला. जपानहून परतत्यानंतर त्यांनी वृत्तपत्र क्षेत्रात प्रवेश केला. ।।५।।

ते स्वातंत्र्यवीर सावरकरांचे सहाध्यायी (विद्यार्थी) होते. त्यांनी इंग्रजी सत्तेला

तीव्र विरोध दाखविला. बॅ.विनायकराव सावरकरांनी तरुणांना सांगितल्याप्रमाणे त्यांनी लोकांना सैन्य भरतीचे महत्व पटवून दिले.।।६।।

इंग्रजांविरुद्ध त्यांनी लिखाण केले. त्यांच्या अशा लेखांमुळे त्यांना तुरुंगवास भोगावा लागला. कापरेकरांची हत्या करणारा दुष्ट यांच्या प्रयत्नांमुळे तुरुंगात गेला.।।७।।

इंग्रजांची हिंदुविरुद्ध असलेली दुष्ट राजनीती व त्यांचे मुसलमानांचा अनुनय करण्याचे धोरण त्यांना सहन झाले नाही. ।।८।।

राष्ट्रपिता महात्मा गांधींच्या वधासाठी विनायकराव सावरकरांना तुरुंगात टाकण्यात आले. या खून खटल्यात रामभाऊंनी विनायकरावांना त्यावेळी पुष्कळ मदत केली. (अण्णासाहेब भोपटकरांच्या बचाव समितीस मदत करुन) ।।९।।

गांधीवधानंतर चिडलेल्या लोकांनी एक होऊन काहींची घरे जाळली. त्यांच्या मालमत्तेची लूट केली. डोक्यावर पांढऱ्या टोप्या घातलेल्यांची आज्ञा ! (दुसरे काय?) ।।१०।।

या संबंधी विधानसभेत प्रश्न उपस्थित करुन जळित पीडितांना सरकारकडून भरपाई म्हणून मदत मिळवून दिली. आपले कार्य संपवून रामभाऊ स्वर्गवासी झाले. त्यांच्या प्रतिमेस मी आज नमस्कार करतो. ।।११।।

***

# १४. नेत्रदातृगौरवम् ।

(उपजातिवृत्तम्)

(कर्जतनगरे कृतवास्तव्यो डॉ.श्रीकान्त वैद्य-महाभागः ४-४-२००० दिने अस्मादृशः सुहृदो दुःखार्णवे मज्जयित्वा पञ्चत्वमगात् । तेन मरणोत्तरनेत्रदानं कृतमासीत् । कर्जतपरिसरे नेत्रदानस्य प्रथमा एव इयं घटनापि संस्थापिता । डॉ.वैद्य महाशयो मे परिवार-चिकित्सकोऽवर्तत । स संस्कृतभाषायां नितान्तं बद्धानुरागोऽभूत् । मया श्रावितानि कानिचन मद्विरचितानि काव्यानि तस्मै भृशमरोचन्त । दोलागृहम् इति गुञ्जारवे प्रकाशितपूर्वं काव्ये तस्य परमरुचयेऽकल्पत । तन्निधनेन शोकाकुलहृदयेन मया तमेवोद्दिश्य प्रणीतं काव्यमत्र प्रस्तूयते।)

न ज्ञायते केन नरः प्रसिद्धश्चिरं स्थितः कर्जतनाम्नि पुर्याम् ।
लब्धप्रसूतिः श्रुतवैद्यवंशे श्रीकान्तवर्यो बुधवैद्यराजः ।।१।।

चित्तोपमार्गे कृतशस्त्रकर्मा प्रारब्धवान् स्तम्भितरुग्णसेवाम् ।
साहाय्यवित्तं वितताार भूरि विद्यार्जनार्थं वृतनिर्धनेभ्य : ।।२।।

परीक्षणार्थं हि गृहस्थरुग्णान् गृहाणि तेषामनुगच्छति स्म ।
चिकित्सको गच्छति कोऽपि नान्यः का तत्र नीतिः किमु शोभनीया ।।३।।

निशादियामे प्रभुणेवरेण्या ययौ गृहं वैद्यमहोदयस्य ।
सेहे न सा वृश्चिकदंशपीडां वैद्यं ययाचे परिरक्षणार्थम् ।।४।।

सूच्यौषधानि त्वरया प्रदाय भद्रीकृता तेन महोदयाऽसौ ।
प्रशंस्य वैद्यं महतादरेण सा शिक्षयामास दिवा स्वशिष्यान् ।।५।।

अथैकदा चित्रगृहं गतोऽयं द्रष्टुं चलच्चित्रपटं दिनान्ते ।
श्रुत्वा तदा कामपि घोषणां द्राक् तूर्ष्णीं प्रतस्थे स गृहं समोदम् ।।६।।

चिकित्सकोऽयं बहुलब्धकीर्तिः क्रीडापटुस्तस्य च यौवनेऽसौ ।
आयुर्विमा कार्मिकयोजनायां भिषक् स आसीदनुमानितोऽपि ।।७।।

चिकित्सकानां शुचिसङ्घनेता आसीत् पुरायं प्रथमः पुरेऽस्मिन् ।
स्त्रीबालरोगज्ञभिषग्वरेण्यः ओङ्कारमित्रस्य च बोधकोऽयम् ।।८।।

श्रीकान्तवर्यः कृतवान् प्रदानं नेत्रद्वयस्यास्य च पूर्वलेखे ।
पुरेतिहासोऽपि लिखेत् सगर्वं भिषग्वरेण्यस्य सुनेत्रदानम् ।।९।।

देहावसानोत्तरनेत्रदानं प्राग्वैद्यवर्यान्न चकार कोऽपि ।
आदर्शभूता हि नृणां बहूनां प्रशंसनीयास्ति कृतिर्वरैषा ।।१०।।

**तस्य प्रिया कन्दुकपट्टकेलिश्चिखेल सम्यग् 'रणजी' विजेतुम् ।**
**दिवङ्गतोऽसौ हृदयाक्रमेण विहाय सर्वानतिदुःखसिन्धौ ।।११।।**

**संस्थापयन् वैद्यकसाहचर्यम् अन्धाय कुर्वन् निजदृष्टिदानम् ।**
**ददद्बहुभ्यः खलु जीवदानं हा हन्त वैद्यो निधनं जगाम् ।।१२।।**

**नेत्रप्रदानायतनं पुरेऽस्मिन् संस्थापनीयं स्मरणार्थमस्य ।**
**नेत्रस्वरूपेऽस्ति महानरोऽयम् आत्मा तथैतस्य लभेत शान्तिम् ।।१३।।**

अनुवाद- (१४. नेत्रदातृगौरवम् )

वैद्य नावाच्या विख्यात वंशात जन्मलेल्या, कर्जतमध्ये कायम रहात असलेल्या, श्रीकांत नावाच्या, विद्वान असलेल्या प्रसिद्ध डॉक्टरांना कोण बरे ओळखत नाही? ।।१।।

हृदयाची बायपास सर्जरी झाल्यानंतर त्यांनी पुन्हा आपल्या थांबलेल्या रुग्णसेवेस प्रारंभ केला. शिक्षणासाठी त्यांनी निवडक गरजूंना पुष्कळ द्रव्य साहाय्य केले. ।।२।।

व्हिजिटसाठी ते रुग्णांच्या घरी जात असत. दुसरा कोणताही डॉक्टर रुग्णांच्या घरी जात नाही. ही अशी वागणूक (त्यांना) शोभते काय? ।।३।।

एकदा रात्रीच्या पहिल्या प्रहरी प्रभुणे नावाची महिला रुग्ण वैद्य यांच्या घरी गेल्या. झालेला विंचूदंश त्यांना सहन होत नव्हता. अशा परिस्थितीत त्यांनी डॉक्टरांकडे वाचविण्यासाठी विनंती केली. ।।४।।

तत्परतेने इंजेक्शने देऊन बाईंना त्यांनी बरे केले. डॉक्टरांची अत्यंत आदरपूर्वक प्रशंसा केली. बाईंनी दिवसभर शाळेत आपल्या विद्यार्थ्यांना (नेहमीप्रमाणे) शिकविलेही. ।।५।।

एकदा ते संध्याकाळी सिनेमा पाहण्यासाठी चित्रपटगृहात गेले. तेथे त्यांच्या नावाची घोषणा ऐकली व शांतपणे ते आनंदाने घरी परतले. ।।६।।

ते खूप कीर्ती मिळविलेले डॉक्टर होते. तसेच तरुणपणी ते एक क्रीडापटूही होते. कामगार विमा योजनेने मान्यता दिलेले सुद्धा ते डॉक्टर होते. ।।७।।

शहरातील डॉक्टरांच्या संघटनेचे ते पहिलेच व स्वच्छ असे संघनायक होते. तसेच स्त्री आणि बालरोगतज्ज्ञ असणारे ते डॉक्टर ओंकार मित्रमंडळाचे सल्लागारही होते.।।८।।

त्यांनी आपल्या मृत्यूपर्व लेखानुसार, आपल्या दोन्ही डोळ्यांचे नेत्रदान केले. या श्रेष्ठ डॉक्टरांच्या नेत्रदानाविषयी कर्जत शहराच्या इतिहासाने नोंद करावी. ।।९।।

डॉ.वैद्यांपूर्वी (कर्जत येथे) मरणोत्तर नेत्रदान कोणीही केले नाही. त्यांची ही कृती स्तुत्य व प्रशंसनीय आहे व ती अनेकांसाठी आदर्शही ठरणारी आहे.।।१०।।

क्रिकेट हा त्यांचा आवडता खेळ असून ते रणजी करंडकासाठी चांगल्या प्रकारे खेळले आहेत. सर्वांना दुःखसागरात सोडून, हार्ट ॲटॅकचे कारण होऊन ते स्वर्गवासी झाले.।।११।।

अरेरे! मेडिकल असोसिएशन स्थापणाऱ्या, अंधाला आपली दृष्टी देणाऱ्या, खरोखर पुष्कळांना जीवदान देणाऱ्या अशा डॉक्टरांचा दुर्दैवी अंत व्हावा ना!।।१२।।

शहरात त्यांचे स्मरणार्थ नेत्रपेढी काढावी. ही महान व्यक्ती नेत्ररूपाने आज अस्तित्वात आहे. त्यांच्या आत्म्यास शांती लाभो. ।।१३।।

******

## १५. कविकुलगुरु-कालिदास-गौरवम् ।

(उपजातिवृत्तम्)

**आसीत् पुरैकः कविरत्नविद्वान् । ख्रिस्ताब्दपूर्वं बुधकालिदासः ।।**
**शकस्य कर्तुर्नृपविक्रमस्य । राज्ये तदानीं पुर उज्जयिन्याम् ।।१।।**

**काव्यं महद्वै रघुवंशनाम । पूर्वं तथा चोत्तरमेघदूतम् ।।**
**शाकुन्तलं मालविकाग्निमित्रम् । ग्रन्था अनेके रचिता अनेन ।।२।।**

**कान्तावियोगः शुचिमेघदूते । पुरूरवाश्च व्यथितस्तथासीत् ।।**
**सीतावियोगो रघुवंशकाव्ये । रत्या विलापोऽपि कुमारकाव्ये ।।३।।**

विचारभावा नु कलास्तथैव । स्त्रियाः स्वभावा रमणीवियोगाः ।।
सौन्दर्यमेषां कथितं नितान्तम् । महाकवेर्निर्मितमेघदूते ।।४।।

निसर्गवासः क्रियतां मुहुर्वै । महाकविं वर्णयितुं प्रधीभिः ।
द्रक्ष्यन्ति जीवत्सु लतादिसृष्टिम् । तथा कृते ते कविना यथोक्तम् ।।५।।

नैराश्यदृश्यं विपदासु दिष्टम् । सत्यं न तत् किन्तु मनुष्यजीवान् ।।
स्फूर्तिर्वराप्तापथदर्शयन्ती । सन्देशरूपं कविना प्रदत्तम् ।।६।।

शृङ्गारभावस्य न केवलं सः । महाकविः किन्तु मनुष्ययोन्याः ।।
तथा पशूनामपि भाष्यकारः । भूतो न भव्यो जगतीतलेऽस्मिन् ।।७।।

आसीत् स राजा प्रणस्य नूनम् । गीतं न तेन प्रणयप्रभुत्वम् ।।
कारुण्यदुःखं विरहो विलापः । अलौकिकत्वेन हि वर्णितानि ।।८।।

देदीप्यमाना प्रतिभा कवेश्च । प्रदर्शितोच्चा श्रुतमेघदूते ।।
जगद्ववन्दे कविकालिदासम् । प्राप्तामरत्वं खलु तस्य काव्यम् ।।९।।

बभ्राम देशे प्रसृते विशाले । विज्ञायते तत् किल मेघदूतात् ।।
हिमालयोद्भूतसुरम्यदृश्यम् । दिशन्ति पुष्पाण्यपि केशराणाम् ।।१०।।

देशाटनं बुद्धिमतां प्रभावम् । सभापटुत्वं नु महाकवेर्वै ।।
वियोगसंयोगरसानुभावाः । विलोकनीयास्तु कवेश्चरित्रे ।।११।।

निरीक्षणं पर्यटनं निसर्गे । आसीत् प्रियं तस्य च मातृभूम्याम् ।
व्योम्ना समं तस्य सुसख्यमासीत् । सप्तर्षितारांकितशुक्लपक्षे ।।१२।।

निरीक्षणं वाचनचिन्तनानि । आसन् गुणाः स्वे कविकालिदासे ।।
प्रशिक्षितास्तेन पुराणवेदाः । वाल्मीकिरेवास्ति कवीश्वरोऽयम् ।।१३।।

**रामायणोपाश्रितमेघदूतम् । प्राज्ञैः प्रयत्नैश्च सुशोधनीयम् ।।**
**ज्ञास्यन्ति सर्वेऽपि मनीषितं मे । प्राचेतसस्यैव कवेः प्रसूतिः ।।१४।।**

**ता नोपमेया उपमास्त्वदीयाः । कवीन्द्र साहित्यखनीषु सत्यम् ।।**
**पुनर्जनिस्ते भविता कदाचित् । संशोधिते चन्द्रमसि त्वदर्थम् ।।१५ ।।**

**चन्द्रगृहे वारि हिमस्वरुपे । हैड्रोजनं प्राणमरुच्च लब्धे ।।**
**युरेनियं लोहममेयमाप्तम् । सुस्वागतं ते भविता सुभव्यम् ।।१६।।**

**ग्रन्था अनेके रचिता त्वया रे । न जन्मवृत्तं लिखितं किमर्थम् ।।**
**तवेतिहासः कथमापनीयः। आकाशवाण्या कथयस्व मह्यम् ।।१७।।**

**गानस्य नृत्यस्य च वादनस्य । निर्देशनं तेन कृतं वरेण्यम् ।।**
**चकास्ति काव्येषु च वैदुषी हि । न कालिदासेन कविः समोऽन्यः।।१८।।**

अनुवाद- (१५. कविकुलगुरु कालिदास गौरव )

इसवीसनपूर्वी शककर्ता राजा विक्रमादित्याच्या राज्यात त्यावेळी उज्जयिनी नगरात एक कालिदास नावाचे कवीराज होऊन गेले. ।।१।।

याने अनेक ग्रंथ रचले, जसे रघुवंश नावाचे महाकाव्य, पूर्व व उत्तर मेघदूत, शाकुंतल व मालविकाग्निमित्र. ।।२।।

मेघदूतातील पत्नीविरह त्याचप्रमाणे पुरुरवाची विरहवेदना, तसेच रघूवंशातील सीतावियोग, कुमारसंभवातील रतिविलाप हे प्रामुख्याने होय. ।।३।।

मनातील निरनिराळे विचार त्याचप्रमाणे निरनिराळ्या कला या सर्वांचे पराकोटीचे सौंदर्य या महाकवीने रचलेल्या मेघदूतात आहे. ।।४।।

या महाकवीचे खरोखरचे वर्णन करण्यासाठी विचारवंतांनी - विद्वानांनी वारंवार निसर्गाचे सान्निध्यात रहावे आणि असे केले असता कवीने सांगितल्याप्रमाणे वृक्षवल्ली इत्यादी त्यांना जिवंत दिसतील. ।।५।।

त्यांच्या काव्यांमधील आपत्तीच्या प्रसंगामध्ये जे नैराश्य दाखविले आहे ते

खरे नाही. मात्र ती मानवी जीवनासाठी योग्य अशी संदेशरुपाने कवीने दिलेली स्फूर्तीच होय.।।६।।

तो काही केवळ शृंगाररसाचे वर्णन करणारा महाकवी नव्हता तर मनुष्ययोनीचा तसेच पशूंच्या जीवनाचाही भाष्यकार होता की जो या संपूर्ण जगात कधीही असा कोणी झाला नाही व होणारही नाही. ।।७।।

तो प्रणयाचा राजा जरुर होता. परंतु त्याने प्रणयाचे मोठेपण काव्यात दाखविले नाही. कारुण्यांतील दु:ख, विरह, विलाप या बाबतीतील त्याची वर्णने अलौकिक आहेत.।।८।।

प्रसिद्ध अशा मेघदूतात कवीची देदीप्यमान उच्च प्रतिभा दिसून येते. सर्व जग कवि कालिदासापुढे नतमस्तक आहे. खरोखर त्याच्या काव्यांना अमरत्व प्राप्त झाले आहे.।।९।।

विशाल पसरलेल्या संपूर्ण देशभर तो फिरला हे खरोखर मेघदूतामुळेच आपणास समजून येते. (अहो) हिमालयातील ती सुरम्य निसर्गदृश्ये तसेच तेथील केशरांची फुलेसुद्धा हेच दाखवितात. ।।१०।।

देशांतर्गत त्याचे फिरणे, काव्यातील वर्णनावरील त्याच्या बुद्धीचा प्रभाव, त्याचे सभाचातुर्य वियोग आणि सहयोग यामधील रसरशीत अनुभव पहाण्याजोगे आहेत.।।११।।

आपल्या मातृभूमीतील निसर्गाचे सूक्ष्म निरीक्षण, पर्यटन हे त्याला अत्यंत प्रिय होते. (अहो) सप्तर्षि चमकत असलेल्या शुक्लपक्षातील तारकायुक्त आकाशाबरोबर त्याची मैत्री होती. ।।१२।।

निरीक्षण, वाचन, चिंतन इत्यादी या कवीमध्ये उपजत गुण होते. त्याने पुराण व वेदांचा अभ्यास केला होता. हा कवी म्हणजे जणू (महर्षि) वाल्मीकिच! ।।१३।।

मेघदूताला रामायणाचा आधार आहे. हे विद्वानांकडून प्रयत्नपूर्वक शोधले जावे आणि माझ्या मनांत जे आहे ते सर्वांच्या लक्षात येईल की खरोखर कालिदास हा कवी महर्षि वाल्मीकिचाच अवतार आहे. ।।१४।।

हे कवींद्रा, हे अगदी सत्य आहे की, तुझ्या साहित्यखाणी अनुपमेय आहेत.

तुझ्यासाठी (आम्ही मानवाने) शोधलेल्या चंद्रावर कदाचित तुझा पुनर्जन्म होईल.।।१५।।

चंद्रावर हिमाचे रुपात पाणी तसेच हैड्रोजन व प्राणवायू यांचा साठा सापडला आहे. तसेच भरपूर प्रमाणात युरेनियमही सापडले आहे. तुझे तेथे भव्य स्वागत होईल.।।१६।।

हे कालिदासा तू भरपूर ग्रंथ रचले आहेस. परंतु कोठेही तू तुझ्या जन्माबाबत का लिहिले नाहीस? तुझा इतिहास आम्ही कसा मिळवावा? (तू असे कर) आकाशवाणीद्वारा मला तू हे कळव. ।।१७।।

गायनकलेचा, नृत्याचा तसेच वादनाचाही त्याने अत्यंत योग्य तऱ्हेने ठिकठिकाणी निर्देश केला आहे. त्याच्या काव्यात त्याची विद्वत्ता प्रकर्षाने जाणवते. कालिदासासारखा दुसरा कोणी कवीच नाही.।।१८।।

*****

## १६. चित्रकार-गौरवम् ।

(श्री.रंगनाथ केशव टेंभुर्णीकरमहोदय: प्रथित: चित्रकार: आसीत् । चित्रलेखने तस्य बाल्यात्प्रभृत्येव छन्द: आसीत् । स: पत्रकार्यालयात् प्रमखपदान्निवृत्त: आसीत् । कार्यकालेऽपि तमिदं छन्दं तं न प्रतिबध्नाति स्म । मेघदूताश्रितानि तस्य मनोहाराणि चित्राणि संस्कृतत्रैमासिके 'गुञ्जारवे' प्रकाशितानि जातानि । प्रथितयशसा साहित्यिकेन श्री.पु.ल. देशपांडे महोदयेन तथा कै.गो.नि.दांडेकरमहोदयेनापि तस्य चित्राणि भूरि प्रशस्तानि । निसर्गचित्रलेखने लब्धपाटव: सिद्धहस्तश्चायं महाभाग: । तस्य स्मृत्यै ममाल्पीयान् काव्यकुसुमाञ्जलि: ।)

(उपजातिवृत्तम्)

**न ज्ञायते केन नर: प्रसिद्धश्चिरं वसन् कर्जतनाम्नि पुर्याम् ।**
**स रङ्गनाथ: पटुचित्रकार: चित्राणि सर्वत्र विभान्ति यस्य ।।१।।**

**आसीत् पुरा तस्य च चित्रभक्तिर्विद्यालयेऽप्यध्ययनस्य काले**
**चित्रप्रशिक्षा न हि तेन लब्धा, न छन्दतो वै विरमन्ति धीरा: ।।२।।**

मुम्बापुरे पुण्यपुरे तथैव प्रदर्शनानां त्रितयं यदासीत् ।
सन्तुष्टचित्तेन विलोकयन्तश्चित्राणि भूरि स्तुवते स्म लोकाः ।।३।।

पत्रालयात् योऽस्ति निवृत्तभृत्यः कथं भवेदद्य स चित्रकारः ।
साश्चर्यमुद्राः प्रवदन्ति लोकाश्चारूणि चित्राणि विलोक्य तस्य ।।४।।

असौ प्रशस्तो हि पुरन्दरेण शिवेतिहासः प्रथितो यदीयः ।
बहूनि मित्राण्यपि तं प्रशस्य तस्मै ददुस्ते बहुधन्यवादान् ।।५।।

बहूनि दुर्गाणि समीक्ष्य तेन रम्येषु चित्रेषु च वर्णितानि ।
निसर्गचित्राणि सुचित्रितानि दैवेन दत्तं नु निधानमेतद् ।।६।।

नैके प्रसङ्गा अपि मेघदूते चित्रीकृताः सन्ति विलोभनीयाः ।
कायेन वृद्धो मनसा युवासौ प्रसन्नवृत्त्या रमते सदैव ।।७।।

शिवेतिहासस्य च चित्रणाय तेनाप्यधीतं शिवबाचरित्रम् ।
तडागचित्रं ततपङ्कजानाम् सुचित्रितं तेन विलोचनीयम् ।।८।।

निसर्गदृश्यानि निरीक्षतेऽसौ यथावकाशे च पुरेषु नित्यम् ।
आनन्दमाप्नोति महान्तमेष भ्रमन् वनान्ते निवसन् गृहे वा ।।९।।

दिशन्ति चित्राणि यथार्थतां हि काव्योचितानीव खलु स्वरूपे ।
कृता प्रशस्तिर्बहुमाननीयैर्जीवन्तु चित्राणि चिरं भविष्ये ।।१०।।

स्मृत्यापि चित्राणि विलिख्य सम्यक् सोऽदर्शयद् बुद्धिविलक्षणत्वम् ।
न याति कोपं स भवान् कदापि प्रीणाति सर्वान् मृदुभाषणेन ।।११।।

सन्मानितव्यो निजशासनेन पात्रस्तदर्थं हि महोदयोऽयम् ।
स्फूर्तिं लभन्तां नवचित्रकारा लभेत तेषां च यशोऽपि कश्चित् ।।१२।।

**स्वयं न गृह्णाति स मानवित्तम् आनन्ददानाय दुनोति देहम् ।**
**ब्रुवन् निसर्गैः सह रङ्गनाथ आरोग्यमायुर्विपुलं लभेत ।।१३।।**



**'रङ्गस्य नाथोऽपि समासरूपं**
**तं रङ्गनाथं समलङ्करोति ।**
**अस्तु प्रणामश्चरणारविन्दे**
**सदाशिवाख्यस्य कवेः सदैव ।।१४।।**

अनुवाद- (१६. चित्रकार-गौरवम्)

(श्री. रंगनाथ केशव टेंभुर्णीकर हे प्रसिद्ध चित्रकार होते. चित्रे काढणे हा लहानपणापासूनच त्यांचा छंद होता. ते पोस्टखात्यातून पोस्टमास्तर या पदावरुन निवृत्त झाले होते. नोकरी करीत असताना सुद्धा त्यांच्या या छंदात बाधा येत नव्हती. त्यांची मेघदूतातील वर्णन केलेल्या निसर्ग वर्णनानुसारची काही सुंदर चित्रे गुंजारव या संस्कृत त्रैमासिकात प्रकाशित झाली आहेत. प्रसिद्ध साहित्यिक श्री.पु.ल.देशपांडे व श्री.गो.नी.दांडेकर यांनी त्यांच्या चित्रांची प्रशंसा केली आहे. निसर्गचित्रे काढण्यात ते सिद्धहस्त पटाईत चित्रकार होते. त्यांच्या स्मृतीस माझी अल्पशी काव्यकुसुमाञ्जली.)

कर्जत शहरात कायम वास्तव्य असलेल्या, ज्यांची चित्रे अनेक ठिकाणी आढळतात असे कुशल चित्रकार श्री.रंगनाथराव यांना कोण ओळखत नाही ।।१।।

शालेय काळातच त्यांचा चित्रकलेकडे ओढा होता. त्यांना चित्रकलेचे शिक्षण कोठेही प्राप्त झाले नव्हते. परंतु जे धैर्यवान असतात ते त्यांच्या छंदापासून कधीही ढळत नसतात. ।।२।।

मुंबई तसेच पुणे येथे त्यांच्या चित्रांची जेव्हा प्रदर्शने होत त्यावेळी प्रदर्शने पाहणारे अत्यंत खूष होऊन चित्रांची प्रशंसा करीत. ।।३।।

जो माणूस पोस्टखात्यातून निवृत्त झाला आहे तो आज चित्रकार असा होईल?

त्यांची सुंदर चित्रे पाहून लोक आश्चर्याने असे म्हणत असत. ।।४।।

प्रसिद्ध शिवचरित्रकार श्री.पुरंदरे यांनीही त्यांची प्रशंसा केली. अनेक मित्रांनी सुद्धा त्यांची प्रशंसा करुन त्यांना धन्यवाद दिले. ।।५।।

त्यांनी अनेक किल्ल्यांचे निरीक्षण करुन सुंदर सुंदर चित्रे रेखाटली आहेत. निसर्गाचे सुंदर चित्रण करणे ही दैवाने त्यांना दिलेली देणगीच होय. ।।६।।

मेघदूतातील विलोभनीय निसर्गवर्णने त्यांनी रेखाटली आहेत. शरीराने ते वृद्ध असले तरी मनाने ते तरुण असून कायम प्रसन्नचित्त असतात. ।।७।।

शिवाजी महाराजांच्या ऐतिहासिक प्रसंगांची चित्रणे करण्यासाठी त्यांनी शिवचरित्र अभ्यासिले. विस्तीर्ण तळ्यात पसरलेल्या कमळांचे सुंदर चित्रण त्यांनी केले आहे.।।८।।

वेळ मिळताच ते नेहमी अन्य नगरातील निसर्ग निरखून बघतात. वनात फिरताना असो किंवा घरात असताना सुद्धा ते नेहमी आनंदी असतात. ।।९।।

काव्यांतून वर्णन केल्याप्रमाणे त्यांच्या चित्रात हुबेहूबपणा दिसतो. मोठ्यामोठ्यांनी त्यांच्या चित्रांची प्रशंसा केली आहे. भविष्यात त्यांची चित्रकला चिरंजीवी होवो. ।।१०।।

आठवणीत साठविलेली चित्रेसुद्धा त्यांनी उत्तम तऱ्हेने रेखाटून त्यांचे ठिकाणी असलेल्या विलक्षण बुद्धीमत्तेचे दर्शन घडविले ते कधीही रागावत नाहीत. मधुर वाणीने ते सर्वांवर प्रेम करीत असतात.

आपल्या शासनाकडून त्यांचा सन्मान होणे आवश्यक आहे. कारण त्यासाठी ते योग्य आहेत. नवचित्रकारांना (त्यांच्या चित्रांपासून) स्फूर्ती प्राप्त होवो. त्यात त्यांना निश्चितपणे यश मिळेल. ।।१२।।

ते स्वत: मानधन घेत नाहीत. दुसऱ्यांना आनंद देण्यासाठी ते देह झिजवतात. निसर्गाबरोबर भाषा करणाऱ्या श्री. रंगनाथराव यांना विपुल आयुष्य लाभो. ।।१३।।

रंगांचा स्वामी असे सामासिक रुप ही रंगनाथरावांचा अलंकार आहे. सदाशिव नावाच्या या कवीचा त्यांच्या चरणकमलावर प्रणाम. ।।१४।।

*****

## १७. लोकलयानम् । (बालगीतम् )

**लोकलयानं धावति नित्यम् । कर्जत–मुम्बईपर्यन्तम् ।।**
**सिग्नलवर्णं रक्तं दृष्ट्वा । विरमति तूर्ष्णी विना विलम्बम् ।।**

**सिग्नलवर्णं पीतं दृष्ट्वा । प्रचलति पुरतो मन्दं मन्दम् ।।**
**सिग्नलवर्णं हरितं दृष्ट्वा । प्रचलति पुरतः स्वयं सवेगम् ।।**

**छात्राः, छात्रान्, फलविक्रेतन् । अन्धान्, पङ्गून्, वृद्धान्, दीनान् ।।**
**मूकान्, बधिरान्, वैद्यान्, रुग्णान् । भृत्यान्, लोकान् वहति सदैवम् ।।**

**वस्तूनि शाकं विपणिं नयति । स्थाने स्थाने विरमत् विरमत् ।।**
**सायंकाले अहं प्रतीक्षे । लोकलद्वारे तिष्ठन्तीम् ।।**
**जननीं मे गृहमायान्तीम् । जननीं मे गृहमायान्तीम् ।**

**अनुवाद- लोकलगाडी (बालगीत)**

लोकलगाडी रोज धावते कर्जत ते मुंबईपर्यंत
सिग्नल लाल पाहिल्यावर ताबडतोब खोटी न करता थांबते ।

सिग्नल रंग पिवळा दिसताच हळूहळू चालत राहते
सिग्नलचा रंग हिरवा दिसताच वेगाने पुढे धावते ।

विद्यार्थी, विद्यार्थिनी, फळ विक्रेते आंधळे, पांगळे, वृद्ध गरीब
मुके, बहिरे, डॉक्टर, रोगी, नोकर, इत्यादी लोकांची ती नेहमी वाहतूक करते ।

चीजवस्तू भाजीपाला बाजारात नेते प्रत्येक स्टेशनवर थांबून थांबून
सायंकाळी मी वाट पहात असतो लोकलच्या दारात उभी असलेल्या,
घरी येणाऱ्या माझ्या आईची घरी येणाऱ्या माझ्या आईची

*****

# १८. कथय कोऽहम् कथय कोऽहम् ।

धावामि धरणीं चरणं विनाऽहम् । गच्छामि गगनं विना विमानम् ।
पश्यामि लोकान् विना लोचनम् । शृणोमि भाष्यं कर्णं विनाहम् ।।१।।

अहं न याचे वस्त्रं कदापि । अहं न याचे खाद्यं कदापि ।
अहं न याचे जलं कदापि । अहं न याचे धनं कदापि ।।२।।

पतामि हस्ते क्वचित् प्रसङ्गे । पतामि हस्तात् क्वचित् प्रसङ्गे ।
करोमि पारं सीमारेखाम् । न रोधयति चेत् रेखापूर्वम् ।।३।।

क्षिपन्ति यष्ट्यां दूरादहो माम् । प्राप्नोमि पृष्ठे पट्टप्रहारम् ।
निपत्य यष्टिं प्रहिणोमि शीघ्रम् । पट्टाधारकं पटमण्डपेऽहम् ।।४।।

विमुच्य हस्तात् पुनरुत्पतामि । गत्वा सुदूरं स्थित्वा हसामि ।
धर्तुं यतन्ते वितथं परं मां । उद्धृत्य मां ते प्रतिक्षिपन्ति ।।५।।

न रोधयति मां जातीयवादः । चण्डातपो वा वर्षा तथा वा
विश्वमेलनं विश्व-एकताम् । कार्यं मे सततं, कार्यं से सततम् ।।६।।

कथय कोऽहं कथय कोऽहम् ।।

अनुवाद – **ओळखा मी कोण? ओळखा मी कोण?**

पाय नसून मी जमिनीवर पळतो, विमान नसूनही मी आकाशात जातो
डोळे नसूनही मी लोकांना पाहतो, कान नसूनही मी बोलणे ऐकतो ।।१।।

मी कधीही नेसण्यासाठी कपडे मागत नाही, मी कधीही खाण्यासाठी मागत नाही
मी कधीही पाणी मागत नाही, मी कधीही पैशाची मागणी करीत नाही ।।२।।

केव्हा केव्हा मी हातात पडतो, कधी कधी मी हातातून निसटून पडतो
मला कोणीही अडविले नाही, तर मी सीमारेषा पार करतो ।।३।।

अहो मला फार लांबूनच यष्टीवर फेकतात, व माझ्या पाठीवर बॅटचा प्रहार करतात
यष्टीवर आदळून मी ताबडतोब, फळी (बॅट) धारकाला तंबूत पाठवितो ।।४।।

हातातून निसटून मी पुन्हा वर उडतो, व दूर उभा राहून हसतो
मला पकडण्याचा व्यर्थ प्रयत्न करतात, व पुन्हा उचलून उलट फेकतात ।।५।।

मला जातपात अडवत नाही, कडक उन्हाळा किंवा पाऊसही (अडवत नाही)
जगाचे संघटन व एकता करणे, हेच माझे आहे नेहमीचे काम नेहमीचे काम ।।६।।

*****

# १९. कथय कोऽयम्

(उपजातिवृत्तम्)

**अयं न भक्तो न च पूजको वा । घण्टां स्वयं नादयते तथापि ।।**
**धनं जनेभ्यः किल याचतेऽयम् । न याचको वा न च निर्धनो वा ।।१।।**

**धनं प्रभूतं स चिनोति नित्यम् । स्वामी परं नास्ति धनस्य नूनम् ।।**
**स्वयं न वैद्योऽपि विपत्तिकाले । करोति शीघ्रं प्रथमोपचारान् ।।२।।**

**जानाति को वा बुधवाचकेषु । महोदयः स्यात् बसवाहको वा ।।**

अनुवाद – ( सांगा हा कोण?)

हा भक्त नाही तसेच पुजारीही नाही. परंतु हा घंटा मात्र वाजवतो. हा लोकांकडे पैशाची मागणी करतो. परंतु तो भिकारी अथवा निर्धनही नाही.

तो भरपूर रक्कम गोळा करतो, परंतु पैशांचा मालक नाही, स्वतः डॉक्टर नसून तो संकटकाळी मात्र लोकांवर लगेच प्रथमोपचार करतो.

सूज्ञ वाचकांमध्ये हा कोण आहे ते कोणी ओळखतो का ते बघा. हा महाभाग बसचा कंडक्टर (वाहक) असेल का हो?

*****

# २०. जानाति को वा मम नामधेयम् (१)

(उपजातिवृत्तम् )

**तृष्णा न मे वा न तथा क्षुधा वा । पादौ न मे वा नयने न मे वा ।**
**शिरो न मे वा वदनं न मे वा तथापि लोकेषु चरामि नित्यम् ।।१।।**

**ज्ञानं भविष्यं कथये जनेभ्यः । सुशब्दकूटैः रमयामि कांश्चित् ।**
**जानाति को वा मम नामधेयम्? तदस्ति किं वा दिनवृत्तपत्रम् ।।२।।**

**भ्रमामि पद्भ्यां जनतासु नित्यम् । यानं मदर्थं हि निरर्थकं स्यात् ।**
**करे समूहो धृतकर्गजानाम् । स्कन्धेऽस्ति कोषो निहितस्तथैव ।।३।।**

**सोपानमार्गाः यदि मां त्रसन्ति । तथापि तुष्टोऽस्मि सदा प्रसन्नः ।**
**लोकप्रियोऽहं गणवेशधारी । जानाति को वा मम नामधेयम् ।।४।।**

**न मे निवृत्तिर्न च मेऽवकाशः। न मे विरामो न च रञ्जनं मे ।**
**कार्यं महन्मेऽस्ति गृहे गृहेऽपि । जानाति को वा मम नामधेयम् ।।५।।**

**कुटुम्बिनीनां विपदो भवन्ति न स्यामहं कार्यरता कदापि ।**
**विश्वासनीयास्मि सदा प्रसन्ना । जानाति को वा मम नामधेयम् ।।६।।**

(उत्तराणि १.२. वृत्तपत्रम्, ३.४ पत्रवितारक: ५.६ पात्रप्रक्षालिका नारी च)

अनुवाद – सांगा मी कोण? (१)

मला तहान नाही तसेच भूकही नाही. मला पाय नाहीत तसेच डोळेही नाहीत. मला डोके नाही व तोंडही नाही. परंतु मी लोकांमध्ये हिंडतो, लोकांना मी माहिती देतो. त्यांचे भविष्यही सांगतो. काहींचे मी शब्दकोड्यांनी मनोरंजनही करतो. माझे नाव कोणास माहिती आहे का? अहो ते रोजचे वर्तमानपत्र आहे का हो?

मी लोकांमध्ये नेहमी पायी हिंडतो कारण कोणतेही वाहन, माझेसाठी निरर्थक ठरेल. मी हातामध्ये कागदांचा गठ्ठा धारण करणारा आहे. माझ्या खांद्यावर तशीच पिशवीही असते. इमारतीचे जिने जरा मला त्रासदायक असतात. तरीसुद्धा मी नेहमी

प्रसन्न व संतुष्ट असतो. मी गणवेश धारण करणारा सर्वांना प्रिय असणारा आहे. माझे नाव कोणास माहिती आहे का हो?

मला निवृत्ती नाही व सुट्टीही नाही. मला विश्रांती नाही व मोकळीकही नाही व मनोरंजनही नाही. घराघरातून माझे महत्वाचे काम असते. माझे नाव कोणास माहिती आहे का? मी कधी कामावर नसेन तर कुटुंबातील स्त्रियांवर संकट ओढवते. मी विश्वासूआहे व नेहमी प्रसन्न असते. माझे नाव कोणास माहिती आहे का हो?

(उत्तरे - १.२ वर्तमानपत्र ३.४ - पोस्टमन ५.६ -भांडी घासणारी बाई.)

*****

# २१. जानाति को वा मम नामधेयम् (२)

(उपजातिवृत्तम्)

**ऊर्ध्वादधस्तं भुवि मे प्रवासः । तथाप्यधस्तान्न कदापि चोर्ध्वम् ।।**
**चलामि धावामि विना विरामम् । न मूलभूमिं पुनरेमि नूनम् ।।१।।**

**भिन्नप्रदेशेषु तथा वनेषु । सेतोरधस्तादपि मे प्रवासः ।।**
**कदापि कस्मादपि मे न भीतिः । चण्डातपे वा शिशिरे ऋतौ वा ।।२।।**

**ऋतौ निरभ्रे ततचन्द्रिकायाम् । चन्द्रस्य बिंबं मयि कौमुदीं च ।।**
**विलोकयन्तः रतपर्यटन्तः । नृत्यन्ति गायन्ति विनोदयन्ति ।।३।।**

**न मेऽस्ति बन्धुर्न च बान्धवा मे । न मे सखायो न च शत्रवोऽपि ।।**
**तथापि सख्यो विपुला मदीयाः । देशे विदेशे प्रसृताः भवन्ति ।।४।।**

**माता मदीया पृथिवी पवित्रा । पृष्ठे धरन्ती सततं प्रवासे ।।**
**जानाति को वा मम नामधेयम् । तदस्ति किं वा तटिनी नदी वा ।।५।।**

अनुवाद – सांगा मी कोण?

वरुन खाली जमिनीवरुन माझा प्रवास असतो. परंतु खालून वर कधीही नसतो. मी चालते, धावते मला विश्रांती नसते मी मूळ जागेकडे पुन्हा जात नसते ।।१।।

निरनिराळ्या प्रदेशांतून, जंगलातून तसेच पुलाखालून सुद्धा माझा प्रवास असतो. मला कधीही कोणाकडूनही भीती नसते. कडक उन्हाळा असो वा थंडी.।।२।।

निरभ्र आकाशातील पसरलेल्या चांदण्यात माझ्यातील पडलेले चंद्राचे प्रतिबिंब तसेच चांदणेही पाहताना रममाण झालेले पर्यटक आनंदून नाचतात, गातात व मनोरंजन करतात. ।।३।।

मला भाऊ नाही व नातेवाईकही नाहीत. मला मित्र नाहीत तसेच शत्रूही नाहीत. परंतु देशात व परदेशात पसरलेल्या मैत्रिणी मात्र भरपूर आहेत. ।।४।।

सततच्या प्रवासात पाठीवर धरणारी माझी आई पवित्र अशी पृथ्वी आहे माझे नाव कोणास माहीत आहे का? अहो ते तटिनी । नदी आहे का? ।।५।।

*****

# २२. जानाति को वा मम नामधेयम् (३)

(उपजातिवृत्तम्)

**हस्तेन धृत्वा नयते बहिर्माम् । आनीयते मां सदनं तथैव ।।**
**मां पाति नित्यं स्वशिशोः समानम् । न बालकोऽहं न शिशुस्तथैव ।।१।।**

**स्वामी न मां स्नाति कदापि नूनम् । देवो हि मां सिञ्चति वृष्टिकाले ।।**
**जानाति को वा मम नामधेयम् । तदस्ति वर्षासमयस्य छत्रम् ।।२।।**

<u>अनुवाद – सांगा मी कोण?</u>

हाताने धरुन मला बाहेर नेतात. त्याचप्रमाणे घरी आणतात. मला स्वतःच्या मुलाप्रमाणे सांभाळतात. परंतु मी मूल किंवा लहान बाळ नाही

माझा मालक मला कधीही आंघोळ घालत नाही, देवच मला पावसाळ्यात आंघोळ घालतो. माझे नाव कोणास माहीत आहे का? ते तर पावसाळ्यातील छत्री आहे का?

*****

# २३. जानाति को वा मम नामधेयम् –(४)

(उपजातिवृत्तम् )

**नरस्य वेषस्य भवामि भागः । न सूचकः सीव्यति भागमेतम् ।।**
**शुभेषु कार्येषु विराजमानः । श्रेष्ठोऽस्मि वेशेषु ममोर्ध्ववासात् ।।१।।**

**श्यामोऽस्ति वर्णो धवलस्तथा मे । प्रक्षालनं मे क्रियते न नित्यम् ।।**
**जानाति को वा मम नामधेयम् । तद्वर्तते वा प्रथितं शिरस्त्रम् ।।२।।**

अनुवाद – **सांगा मी कोण?**

मी पुरुषवेशाचा एक भाग आहे. कोणीही शिंपी माझी शिलाई करुन देत नाही. मी शुभकार्यांमध्ये शोभून दिसणारा असून माझे वेषांमधील सर्वात वरचे स्थान असलेमुळे मी सर्व वेषांमध्ये श्रेष्ठ आहे. माझा काळा व पांढरा रंग असतो. मला नेहमी धुतले जात नाही. माझे नाव कोणास माहीत आहे का? ते डोक्यावरील टोपीचे आहे का?

*****

# २४. जानाति को वा मम नामधेयम् –(५)

(उपजातिवृत्तम्)

**पद्भ्यां नयन्ते सततं बहिर्माम् । तथा गृहं मां पुनरानयन्ति ।।**
**कुटुंबिकानां घटकोऽस्मि नूनम् । जानाति को वा मम नामधेयम् ।।१।।**

**कुटुंबिकानां घटकोऽपि भूत्वा । स्थानं मदीयं सदनस्य कोणे ।।**
**मार्गस्थगर्ताः बहु मां त्रसन्ति । परं तदर्थं न च कोऽप्युपायः ।।२।।**

**चण्डातपः पीडयते ममाङ्गम् । शीतं तथा कम्पयते शरीरम् ।।**
**नृणां तनूनां निजरक्षकोऽस्मि । तथापि ते मामवमानयन्ति ।।३।।**

**क्षिपन्ति मञ्चं प्रति मां सभासु । श्रुत्वाऽप्रियां वाचमतिप्रकोपात् ।।**
**चित्वा न मां तेऽपि चिरं त्यजन्ति । क्रुद्धाः जनाः सन्ति विवेकहीनाः।।४।।**

**भूत्वा विदीर्णां सुतनूं मदीयाम् । क्षिपन्ति दूरं च विना विलम्बम् ।।**
**जानाति को वा मम नामधेयम् । तद् वर्तते वा प्रथितं पदत्रम्? ।।५।।**

अनुवाद – ओळखा मी कोण आहे?

नेहमी मला पायांनी बाहेर नेतात व त्याचप्रमाणे मला पुन्हा घरी आणतात. मी कुटुंबाचा घटक आहे. माझे नाव कोणी ओळखतो का? ।।१।।

मी कुटुंबाचा घटक असून सुद्धा घरातील कोपरा ही माझ्यासाठी जागा आहे. रस्त्यातील खड्डे मला खूप त्रास देतात. परंतु त्यासाठी काहीच उपाय नाही. ।।२।।

कडक उन्हाळा माझ्या शरीरास वेदना देतो. गारठ्याने माझे अंग कापते. माणसाच्या शरीरांचा मी स्वतःच रक्षक आहे. तरी ते माझा अवमान करतात. ।।३।।

सभांतील अप्रिय भाषण ऐकून राग आल्याने मला वक्त्यांकडे फेकतात. मला गोळा न करता मला कायमचे टाकतात.(अहो) रागीट लोक विचारशून्य असतात. ।।४।।

माझे सुंदर शरीर जीर्ण झाल्यावर ताबडतोब मला दूर फेकून देतात. माझे नाव कोणास माहीत आहे का?(अहो) ते तर पादत्राण/पायतण असेल का? ।।५।।

*****

# २५. देहस्य व्याख्या ।

**देहो जनानां निजभोगशाला प्रयोगशालास्ति चिकित्सकानाम् ।।**
**वणिग्जनानां व्यवसायशाला आरक्षिता जन्तुविहारशाला ।।**

**कालाय तस्मै नमः ।**

अनुवाद- : एकदा श्रावण महिन्यात प्रवचन मालिकेत प्रवचन देणारे एक विद्वान मनुष्यदेहाबद्दल सांगतात – हे शरीर परोपकारासाठी आहे. परंतु आजकाल देह म्हणजे काय दिसते ते ऐका–देह म्हणजे लोकांचे स्वतःचे भोग भोगण्याचे ठिकाण आहे. डॉक्टरलोकांची ती एक प्रयोगशाळा आहे. व्यापारी (केमिस्ट) लोकांचे तर ते धंद्याचे ठिकाण आहे. तसेच देह म्हणजे रोगजंतूंना आनंदाने विहार करण्याची ती राखीव जागा आहे. चालायचंच. हा काळाचा महिमा आहे.

*****

## २६. विश्वदूतौ

**यमः स्याद्वा भटः स्याद्वा दूतौ स्तो भुवने खलु ।**
**देवदूतो यमः स्वर्गे राजदूतो भटो भुवि ।।१।।**

**द्वारे वरं चागमनं यमस्य । परं वरं नास्ति भटस्य नूनम् ।।**
**द्वारे यमस्तिष्ठति चैकवारम् । भटः परं तिष्ठति नैकवारम् ।।२।।**

**यमोऽस्ति ते नाम, न तद् यथार्थम् । यतो न लोके नियमस्त्वदर्थम् ।।**
**प्रणाननेकान् हरतः सदा ते । कुतो विरामोऽपि कुतो निवृत्तिः ।।३।।**

**कार्यं महत्ते किल राजदूत । व्याख्या परं का जनरक्षकस्य ।।**
**करोषि रक्षामिति रक्षकोऽसि । करोषि रक्षामिति नाशको वा ।।४।।**

अनुवाद- : यम असो की, पोलीस असो, दोघेही विश्वातील दूतच होत. यम हा स्वर्गातील देवदूत आहे तर पोलीस हा पृथ्वीवरील राजदूत आहे.

आपल्या दारात यम आलेला बरा. परंतु पोलिसांचे येणे काही चांगले नाही. यम दारात एकदाच येतो. परंतु पोलीस मात्र दारात अनेकवार येतो.

अरे यमा तुझे नाव काही योग्य नाही रे. कारण या जगात तुला काही नियमच नाही. अनेकांचे प्राण सतत हरण करणाऱ्या तुला सुट्टी किंवा निवृत्ती आहेच कोठे?

अरे राजदूता – पोलिसदादा, तुझे काम फार मोठे आहे रे. परंतु जनरक्षक असलेल्या तुझी व्याख्या तरी काय आहे? राखण करतोस म्हणून तुला रक्षक समजायचे की रक्षा म्हणजे राख करणारा म्हणून तुला नाश करणारा समजावयाचे?

*****

## २७. प्रहेलिका ।

(उपजातिवृत्तम्)

**स्थानानि सर्पस्य कियन्ति सन्ति । जलं च भूमिश्च गृहं च नालः ।।**
**तथापि तस्यास्त्यपरा स्वभूमिः । गूढा प्रिया साऽपि सुरक्षिता च ।।१।।**

**न तत्र वृष्टिर्नच तत्र तेजः । न शीतबाधा न च वातपीडा ।।**
**घनान्धकारः खलु वर्ततेऽत्र । एषाऽस्ति सर्पस्य ही पञ्चमी भूः ।।२।।**

**जानाति को वा बुधवाचकेषु । किं नाम सर्पस्य निगूढभूमेः ।।**
**तस्योत्तरं स्यात् कठिनं महद्वा । तदस्ति किं वा विवरं द्रुमस्थम् ।।३।।**

अनुवाद – कोडे

सर्पाची किती ठिकाणे आहेत? पाणी, जमीन, घर व पाईप. परंतु त्याची वेगळी अशी स्वतःची जागा आहे व ती गुप्त, आवडती व सुरक्षित सुद्धा आहे. ।।१।।

त्या ठिकाणी पाऊस नाही, प्रकाश नाही, थंडीचा त्रास नाही. तसेच वारा-वादळही नाही. येथे दाट काळोख आहे. आणि हीच सर्पाची पाचवी जागा आहे. ।।२।।

सर्पाच्या या गुप्त जागेची माहिती जाणकार वाचकांपैकी कोणास आहे का? त्याचे उत्तर फार कठीण असेल का? अहो ती जागा तर झाडात असलेली ढोली (पोकळ जागा) आहे का? ।।३।।

## २८. सुखी मनुष्यः

(उपजातिवृत्तम्)

**को वर्ततेऽस्मिन् भुवने सुखी सन् । विद्वद्वरा वा धनिकास्तथा वा ।।**
**दीनाः सशक्ता अतिशिक्षिता वा । बाला युवानः कविलेखका वा ।।**

**तस्योत्तरं स्यादिदमेव मन्ये । कृतापराधात् धृतपापकर्मा ।।**
**कारागृहे यो लभते सुनिद्राम् । गाढां सुशान्तां सकलक्षपायाम् ।।**

अनुवाद – या जगात कोण सुखी असणारा आहे? विद्वान लोक, धनवन्त असतील का? गरीब सशक्त, अतिशिकलेले किंवा बालके, तरुणलोक कवी-लेखक असतील कां? मला वाटते त्याचे हे उत्तर असेल की, अपराध केल्यामुळे पकडला गेलेल्या गुन्हेगारास तुरुंगात संपूर्ण रात्रभर गाढ शांत झोप मिळते तो.

*****

# २९. नापितद्वयम्

(अनुष्टुभ्वृत्तम्)

**सर्वत्र नापिताः सन्ति ग्रामेषु च पुरेषु च ।**
**ग्रामस्थस्य पुरस्थस्य मध्ये भेदश्च वर्तते ।**

**पौरः करे क्षुरं धृत्वा प्रयुङ्क्ते क्षौरकर्मणि ।**
**जल्पको नापितो ग्राम्यः प्रयुङ्क्ते वदनं करम् ।।**

अनुवाद – (दोन न्हावी)

शहरात व खेड्यात सर्व ठिकाणी न्हावी असतात. खेड्यातील न्हावी व शहरातील न्हावी याच्यात फरक असतो. शहरातील न्हावी वस्तारा हातात धरुन क्षौरकर्मात वापरतो. मात्र खेड्यातील बडबडणारा न्हावी त्यासाठी हातातील वस्तरा व तोंड वापरतो.

*****

# ३०. विस्मितगृहम् ।

(उपजातिवृत्तम्)

**गेहं मदीयं पटलं न यस्य**
**द्वारं हि नास्त्यस्य तथैव सीमा ।**
**विशन्ति लोकाश्च बहिः प्रयान्ति**
**कालान्तरे ते निजलाभबुद्ध्या ॥१॥**

**जानाति को मे भवनस्य नाम**
**तदस्ति गूढं कठिनं महद्वा ।**
**किञ्चिद्भवन्तः हृदि चिन्तयन्तु**
**तद् ‘राजपक्षः’ पृथुरस्ति किं वा ॥२॥**

अनुवाद- ( विस्मितगृहम् ) ( चमत्कारिक घर )

ज्याला छप्पर नाही, दारपण नाही, तसेच हद्दही नाही, असेमाझे घर आहे. लोक त्यात शिरतात व कालांतराने स्वतःचा फायदा व्हावा ह्या उद्देशाने बाहेर पडतात.

माझ्या घराचे नाव कोणास माहित आहे का? ते गुप्त किंवा फार कठीण आहे का? (आपल्या) अंतःकरणात थोडा विचार करा. अहो, ते तर मोठा 'राजकीय पक्ष' असे आहे.

*****

# ३१. दीपावली शुभकामना (१)

**राष्ट्रपतिमहाभागं** (डॉ.ए.पी.जे.अब्दुल कलाममहोदयान् )**प्रति पत्रम् –**

स्वस्ति। भारतस्य राष्ट्रपतिपदं विभूषयतः विद्वद्वर्यान् श्रीमतः डॉ.ए.पी.जे.अब्दुल कलाममहोदयान् प्रति सादरं सविनयं वन्दनानि । तत्रभवतः प्रति दीपावली–रमझान–निमित्तं शुभकामनां प्रेषयामि ।

(दीपावली सन २००३) (उपजातिवृत्तम्)

**अण्वस्त्रधारी निजभारतोऽयम् । विश्वस्य नेता प्रभवेत् भविष्ये ।।**
**प्रदाय शक्तिं प्रबलीकरोतु । दीपावलीयं रमझानसङ्गात् ।।१।।**

**आतङ्कवादं सकलं निहन्तुं । राष्ट्राण्यनेकानि समाह्वयन्ती**
**उत्पादयन्ती जनतासु धैर्यम् । दीपावली ताः सबलीकरोतु ।।२।।**

**ग्रहान् नवीनान् दिवि शोधयन्ती । सूर्याद्भवोर्जां जगतेऽपर्यन्ती ।**
**विस्फोटनादैर्भुवि गर्जयन्ती । दीपावली वो वितनोतु सौख्यम् ।।३।।**

अनुवाद – मा.राष्ट्रपती (डॉ.ए.पी.जे.अब्दुल कलाम ) महोदयांकडे पत्र –

स्वस्ति. भारताचे राष्ट्रपतीपद भूषविणाऱ्या विद्वद्वर्य श्री.डॉ.ए.पी.जे.अब्दुल कलाम महोदयांना आदरपूर्वक सविनय वंदन. आपलेकडे दीपावली–पवित्र रमझान निमित्त शुभकामना पाठवीत आहे.

आपला भारतदेश अण्वस्त्रसंपन्न आहे. आगामीकाळात त्याच्याकडे जगाचे नेतृत्व येईल. या दीपावलीने पवित्र रमझानाच्या संगतीने भारतभूमीस बलवान करावे.।।१।।

संपूर्ण आतंकवादाचा समूळ नाश करण्यासाठी, अनेक राष्ट्रांना एकत्र येण्याचे आव्हान करणारी, जनतेमध्ये धैर्य निर्माण करणारी, ही दीपावली जनतेस बलशाली करो. ।।२।।

आकाशात नवीन नवीन ग्रहांचा शोध घेणारी जगास सौरऊर्जा अर्पण करणारी, फटाकडे फोडून जमिनीवर गर्जना करणारी दीपावली आपणांस सौख्यकारी करो.।।३।।

*****

# ३२. दीपावली शुभकामना (२)

**राष्ट्रपतिमहाभागं** (श्रीमती: प्रतिभा पाटीलमहोदया:)**प्रति पत्रम् –**

स्वस्ति ।

भारतस्य राष्ट्रपतिपदं विभूषयन्ती: सन्मानीया: श्रीमती: प्रतिभा पाटीलमहोदया: प्रति सादरं सविनयं वन्दनानि । तत्रभवती: प्रति दीपावलीनिमित्तं शुभकामनां प्रेषयामि ।

**संशोधनार्थं दिवि चन्द्रलोकम् ।**
**सम्प्रेषयन्ती ततचन्द्रयानम् ।।**
**वैज्ञानिकेभ्य: सुयशो ददाना ।**
**दीपावली मङ्गलमातनोतु ।।**

अनुवाद – दीपावली शुभकामना (२)

स्वस्ति. भारताचे राष्ट्रपतीपद भूषविणाऱ्या सन्माननीय श्रीमती प्रतिभा पाटील यांना आदरपूर्वक वन्दन. आपल्याकडे दीपावली निमित्त शुभकामना पाठवित आहे.

आकाशात चंद्रग्रहाचा शोध घेण्यासाठी विशाल चंद्रयान पाठविणाऱ्या वैज्ञानिकांना सुयश देणारी ही दीपावली आपले कल्याण करो. (दीपावली सन २००८)

*****

# ३३.  दीपावली शुभकामना (३)

**राष्ट्रपतिमहाभागं** (प्रधानमन्त्रिणं नरेन्द्र मोदीवर्यं) **प्रति पत्रम् –**

कर्जतपुरम्

१९३६ तमे शके आश्विने वदि त्रयोदश्यां

(२१/१०/२०१४ इति दिनाङ्के)

स्वस्ति। भारतस्य प्रधानमन्त्रिपदं विभूषयद्भ्यो विद्वद्वरेभ्यः श्रीमद्भ्यो नरेन्द्र मोदीमहोदयेभ्यः सादरं नमो नमः। तत्रभवतः प्रति दीपावलीनिमित्तं शुभकामनां प्रेषयामि ।

**मङ्गलभूम्यामवतारयन्ती  मङ्गलयानं प्रथमप्रयासे ।।**
**प्रस्थापयन्ती नवविक्रमं खे  दीपावली मङ्गलमातनोतु ।।१।।**

**आतङ्कवादं सकलं समाप्तुं  स्रष्टुं तदर्थं दृढविश्वसङ्घम् ।।**
**विश्वस्य नेता भवितुं सवेगं  दीपावली त्वां सबलीकरोतु ।।२।।**

अनुवाद – दीपावली शुभकामना (३)

स्वस्ति भारताचे प्रधानमंत्रीपद भूषविणाऱ्या विद्वान श्रीमान नरेंद्र मोदी महोदयांना आदरपूर्वक नमो नमः । आपलेकडे दीपावली शुभकामना पाठवित आहे.

पहिल्याच प्रयत्नात मंगळयानास मंगळग्रहावर उतरविणारी व अंतराळात नवीन विक्रम प्रस्थापिणारी, आतंकवाद संपूर्ण संपविण्यासाठी व त्यासाठी संपूर्ण विश्वाची निरंतर संघटना निर्माण करण्यासाठी तसेच भविष्यातला विश्वाचा तातडीने नेता होण्यासाठी ही दीपावली आपणास सशक्त करो.

卐 ***** 卐

**सरस्वतीं पूजयितुं प्रदीर्घं  गुम्फामि मालां चितशब्दरूपाम् ।**
**मन्ये तदर्थं लघुपूजकोऽहं  नाहं कविर्वा न च लेखको वा ॥**

-- स. त्र्यं. रहातेकर

परिशिष्ट —

# वृत्तविचार

पद्यरचनांपैकी अक्षरगणवृत्त ह्या प्रकारातील वृत्ते समजून घेताना लक्षात ठेवण्याच्या काही गोष्टी —

१) **अ, इ, उ, ऋ** हे ह्रस्व स्वर व ह्या स्वरांनी युक्त असणारी अक्षरे (उदा. क, कि, कु, कृ, ख, खि, खु, खृ , ग, गि, गु, गृ , इत्यादी) ही सर्व **लघु अक्षरे** समजली जातात.

२) **आ, ई, ऊ, ॠ , ए , ऐ , ओ, औ** हे दीर्घ स्वर व ह्या स्वरांनी युक्त असणारी अक्षरे ( उदा. का, की, कू , के, कै, को, कौ, दा, नी, पू , से, रो, तौ, तॄ , इत्यादी ) ही सर्व **गुरु अक्षरे** समजली जातात.

३) ह्रस्व अक्षरावर अनुस्वार असल्यास किंवा पुढे विसर्ग असल्यास ते गुरु होते. उदा. **संशयः** शब्दातील **स** दीर्घ समजला जाईल व **य** सुद्धा दीर्घ समजला जाईल. **दुःखम्** शब्दातील **दु** दीर्घ समजला जाईल.

४) प्रत्येक जोडाक्षराचे मागील अक्षर लघु असेल तर ते गुरु समजावे. **क्ष** व **ज्ञ** ही जोडाक्षरे आहेत, त्यामुळे त्यांचे मागे लघु अक्षर असल्यास ते गुरु होते. त्यामुळे **अक्षरम्** मधील **अ** तसेच **यज्ञ** मधील **य** ही अक्षरे दीर्घ धरली जातील. **वृषभः** शब्दातील **वृ** हे अक्षर लघु आहे, मात्र **वृक्षः** ह्या शब्दातील **क्ष** ह्या जोडाक्षरामुळे **वृ** हे अक्षर गुरु होते.

५) वृत्ताच्या लक्षणात प्रत्येक चरणातील अक्षरांची संख्या दिलेली असते. अक्षरे मोजताना चरणात आलेली अर्धी अक्षरे सोडून द्यावयाची असतात, म्हणजे ती मोजावयाची नसतात. जसे- म् , न् , त् , क् , इत्यादी. उदाहरणार्थ, अ) भ्रमामि नित्यं जनतासु नित्यम् ।

वृत्त - **उपेन्द्रवज्रा**, अक्षरे ११. (ह्यात म् हे अक्षर गणनेत धरू नये.)

ब) यानं मदीयं हि निरर्थकं स्यात् ।

वृत्त - **इन्द्रवज्रा**, अक्षरे ११. (ह्यात त् हे अक्षर गणनेत धरू नये.)

ह्या दोन्ही ओळी एकापुढे एक लिहिल्यास त्या वृत्ताचे नाव **उपजाति** होते, कारण ते दोन्ही वृत्तांचे मिश्रण आहे.

६) **गण** म्हणजेच ३-३ अक्षरांचे गट. त्यांची विशिष्ट नावे पुढीलप्रमाणे -

| गणाचे नाव | लक्षणशब्द | लघुगुरुक्रम | गणाचे नाव | लक्षणशब्द | लघुगुरुक्रम |
|---|---|---|---|---|---|
| य | यमाचा | ᴗ – – | ज | जनास | ᴗ – ᴗ |
| म | मानावा | – – – | भ | भास्कर | – ᴗ ᴗ |
| त | ताराप | – – ᴗ | न | नमन | ᴗ ᴗ ᴗ |
| र | राधिका | – ᴗ – | स | समरा | ᴗ ᴗ – |

‘ ᴗ ’ म्हणजे लघु ( ल ) ; ‘ – ’ म्हणजे गुरु ( ग )

तिनाच्या पटीत न बसणारी जी अक्षरे आहेत, त्यांचेसाठी —

लघु अक्षर असल्यास ‘**ल** ’ व गुरु अक्षर असल्यास ‘**ग** ’ लिहिला जातो.

---

काही अक्षरगणवृत्तांची ओळख —

## (१) इन्द्रवज्रा

वृत्तलक्षण - अक्षरे ११ , गण - **त त ज ग ग** लक्षणपंक्ति - *( ता ता ज गा गा म्हणु इन्द्रवज्रा )*

– – ᴗ – – ᴗ ᴗ – ᴗ – –

उदा॰ **लोकाभिरामं रणरङ्गधीरं राजीवनेत्रं रघुवंशनाथम् ।**
**कारुण्यरूपं करुणाकरं तं श्रीरामचन्द्रं शरणं प्रपद्ये ।।**

## (२) उपेन्द्रवज्रा

वृत्तलक्षण - अक्षरे ११ , गण - **ज त ज ग ग** लक्षणपंक्ति - *( उपेन्द्रवज्रा हि ज ता ज गा गा )*

ᴗ – ᴗ – – ᴗ ᴗ – ᴗ – –

उदा॰ **परोपकाराय फलन्ति वृक्षाः परोपकाराय वहन्ति नद्यः ।**
**परोपकाराय दुहन्ति गावः परोपकारार्थमिदं शरीरम् ।।**

## (३) उपजाति ( इन्द्रमाला )

वृत्तलक्षण- अक्षरे ११, काही चरण इन्द्रवज्रेचे व काही उपेन्द्रवज्रेचे असे हे मिश्र वृत्त आहे.

उदा॰ **मनोजवं मारुततुल्यवेगं जितेन्द्रियं बुद्धिमतां वरिष्ठम् ।**
**वातात्मजं वानरयूथमुख्यं श्रीरामदूतं शरणं प्रपद्ये ।।**

( ह्यात पहिला व दुसरा चरण उपेन्द्रवज्रेचा, तर तिसरा व चौथा चरण इन्द्रवज्रेचा आहे.)

---

**।। शुभं भूयात् ।।**

## पं. सदाशिव त्र्यंबक रहातेकर यांचा परिचय



- **जन्म** – दि.२१/८/१९३३ (मु.कडाव, ता.कर्जत)
- **शिक्षण** – मॅट्रिक मार्च १९५२. टिळक महाराष्ट्र विद्यापीठ पुणे येथील प्रथम व द्वितीय परीक्षा उत्तीर्ण (संस्कृत)
- **व्यवसाय** – १९९१ साली रेल्वेतून 'चीफ यार्ड मास्टर' या पदावरुन निवृत्त

- निवृत्तीनंतर काही वर्षे 'ज्येष्ठ नागरिक संघ, वनवासी कल्याण आश्रम, कोकण मराठी साहित्य परिषद, रेल्वे निवृत्त कर्मचारी संघ' इ. संस्थांमधून कार्य करताना आवडत्या संस्कृत विषयाचा पंडित काळेशास्त्री यांचे मार्गदर्शनाखाली अभ्यास. १९९७ पासून आजपर्यंत संस्कृत गद्यलेखन व वृत्तबद्ध काव्यरचनेचा व्यासंग.

- **सत्कार व पुरस्कार :**

१) दि.९/५/१९९९ जिल्हा व तालुकास्तरीय काव्यलेखन व वाचन स्पर्धेत प्रशस्तीपत्र, स्मृतीचिन्ह, अध्यक्ष को.म.सा.प. यांचेकडून
२) दि.७/६/१९९९ अध्यक्ष निवृत्त रेल्वे कर्मचारी फेडरेशन यांचेकडून
३) १९९९ कै. शाहीर अण्णाभाऊ साठे स्मृती पुरस्कार, पुणे येथे
४) दि.२१/११/१९९९ राज्य सरकारचे मानद संस्कृत सल्लागार पं. श्री.धुं. कवीश्वर यांचेकडून कल्याण येथे सत्कार
५) दि.३०/४/२००० रायगड जिल्हा वृत्तपत्र लेखक संघाकडून 'समाजभूषण' पुरस्कार
६) दि.२८/४/२००२ कर्जत येथे रायगड जिल्हा मराठी साहित्य संमेलनात कविवर्य पदम्श्री कै.नारायण सुर्वे यांचेकडून सत्कार.
७) दि.२१/५/२००२ अध्यक्ष ज्येष्ठ नागरिक संघ यांचेकडून सत्कार.
८) दि.९/४/२०१६ सनातन धर्मसभा अहमदनगर यांचेकडून पू.जगद्गुरु शंकराचार्य करवीरपीठ यांचे हस्ते शाल, श्रीफळ, स्मृतिचिन्ह देऊन अहमदनगर येथे सत्कार.
९) दि.११/५/२०१६ 'आदर्श साहित्यिक' पुरस्कार 'साप्ताहिक रायगडची खाण', कर्जत यांचेकडून
१०) दि.१६/७/२०१६ लक्ष्मीकांत सार्वजनिक वाचनालय, कर्जत यांचेकडून कविकुलगुरु कालिदास दिनानिमित्त सत्कार
(माझ्या जन्मगावचे वैदिक पंडित कै. त्र्यंबक नारायण रहातेकर व कै.भालचंद्र गणेश उपाध्ये तसेच संस्कृतचे गाढे अभ्यासक, कवी, लेखक कै.भास्कर केशव कोशे हे विद्वान होऊन गेले आहेत.)